 Regd. No. M H 1332

# नवभारत

या अंकात –




वर्ष २८

अंक दहावा

जुलै १९७५

रु. १-२५


अनुक्रमणिका

















नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष अठ्ठाविसावे अंक दहावा

# नवभारत

जुलै १९७५

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर— प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. मे. पुं. रेगे का. संपादक



वार्षिक रु. १२ अंकास रु. १·२५

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता :—

१. संपादकीय :— कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक, प्राध्यापकांचे निवासस्थान कीर्ति कॉलेज, दादर-मुंबई २८

२. व्यवस्थापकीय :— व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक, C/o दी प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

श्री. स. आ. सप्रे

# औद्योगिक क्रांति : एक अर्थशास्त्रीय मीमांसा*

औद्योगिक क्रांती याचा अर्थ आधुनिक उद्योगधंद्यांची प्रस्थापना हा होय. आधुनिक उद्योगधंदे म्हणजे काय, त्यांचे खास वैशिष्टय कोणते या प्रश्नाचा विचार या लेखात करावयाचा आहे. प्राचीन हस्तव्यवसाय आणि आधुनिक धंदे यामध्ये मूलभूत फरक काय आहे हे आपल्याला पाहावयाचे आहे. तांत्रिकदृष्टया या प्रश्नास अनेक उत्तरे संभवतात आणि त्यांचाही येथे विचार केला जाईल. परंतु मुख्यतः येथे अभिप्रेत आहे ते औद्योगिक क्रांतीचे अर्थशास्त्रीय विश्लेषण.

हस्तव्यवसाय आणि व्यापारउदीम यांच्यामध्ये अर्थशास्त्राच्या दृष्टीने मूलभूत असा फरक नाही हस्तव्यवसाय करणारा कारागीर कच्चा माल विकत घेतो व त्यावर काही प्रक्रिया करून तो स्वतःच विकत असतो. व्यापारी पक्का माल विकत घेऊन कालांतराने इतरत्र नेऊन विकतो. पक्या मालाचे स्वरूप तो बदलत नाही परंतु ग्राहकांकरिता माल सुरक्षित ठेवणे, एका ठिकाणाहून दुसरीकडे नेणे व विकणे या गोष्टी तो करीत असतो. ही एक प्रकारची प्रक्रियाच होय आणि त्यामुळे मालाचे मूल्य वाढते. याकरिता अर्थशास्त्राच्या दृष्टीने हस्तव्यवसाय आणि व्यापार यांमध्ये मूलभूत साम्यच आहे.

हे साम्य तत्वज्ञानी व क्वचित् प्रसंगी अर्थशास्त्रज्ञांनीही अमान्य केले असले तरी व्यवहारात ते दिसून येतेच. जमाखर्चाचा तपशील पाहिला म्हणजे धंद्याचे स्वरूप लक्षात येते. उत्पादक संस्था व व्यापारी संस्था यांच्या हिशोबाच्या मांडणीकडे लक्ष दिल्यास त्यामध्ये साम्य आहे हे सहज लक्षात भरते.

---

* हा लेख म्हणजे सर जॉन हिक्स् या नोबेल प्राईझ विजेत्या विख्यात अर्थशास्त्रज्ञाच्या "ए थिअरी ऑफ इकॉनॉमिक हिस्टरी" या अप्रतिम ग्रंथातील "दि इंडस्ट्रियल रिव्होल्युशन" या प्रकरणाचा संक्षिप्त गोषवारा आहे. या ग्रंथातील विवेचन गेल्या चार हजार वर्षातील आर्थिक उलाढालीवर आधारलेले आहे.



अनुक्रमणिका







हे साम्य आता मात्र पूर्वीइतके दिसत नाही याचे कारण म्हणजे व्यापाऱ्यांचे सर्वच भांडवल खेळते असते याच्या उलट उद्योगधंद्यामध्ये स्थिर भांडवलाचे प्रमाण मोठे असते. व्यापारीही कार्यालये, गोदामे, जहाजे याकरिता काही भांडवल गुंतवतात परंतु त्याचे प्रमाण अगदी अल्प असते. कोणत्याही उद्योग-धंद्याच्या प्राथमिक अवस्थेमध्ये त्याचे स्वरूप हस्तव्यवसायासारखेच असते आणि स्वतंत्रपणे काम करणारा कारागीर आणि असे प्राथमिक स्वरूपाचे उद्योगधंदे यामध्ये विशेष फरक असा असतच नाही. कारागिरांनाही काही हत्यारे लागतात. परंतु त्यांची किंमत माफकच असते आणि मुख्य भर मालाच्या एकूण उलाढालीवर असतो. परंतु स्थिर भांडवलाचे प्रमाण वाढू लागल्याबरोबर उद्योगधंद्याचे स्वरूप मूलतःच बदलू लागते आणि औद्योगिकक्रांतीची हीच खरी सुरवात होय.

आधुनिक उद्योगधंद्यांचा प्रारंभ होण्यापूर्वी इमारती, वाहतुकीची साधने मुख्यतः जहाजे याकरिता स्थिर भांडवलाची जरूरी लागे. परंतु इमारती ह्या मुख्यतः उपभोग्य वस्तू म्हणूनच वापरल्या जातात. उत्पादनाचे साधन म्हणून आपण त्यांचा विचार करीत नाही. वाहतुकीची साधने मुख्यतः व्यापाराच्याच सोयीकरीता असतात, उत्पादनाच्या नव्हे. १८ व्या शतकाच्या उत्तरार्धात औद्योगिक क्रांतीस प्रारंभ झाला तेव्हा उत्पादनाच्या कार्याकरिता स्थिर भांडवली वस्तूंचा वापर वाढत्या प्रमाणात होऊ लागला. ही वाढ एकाच वेळी एकाच प्रकारे झाली नाही तर ती सतत होत गेली. अर्थशास्त्रीय दृष्टचा औद्योगिक क्रांतीचे खरेखुरे लक्षण म्हणजे स्थिर भांडवली वस्तूंची विविधता व व्याप्ती यामध्ये सतत वाढ होऊ लागली व त्याकरिता गुंतवणूक अधिक अधिक होऊ लागली हे होय.

औद्योगीकरणाची अशी व्याख्या केल्यास औद्योगीकरण म्हणजे व्यापार-वृद्धीचाच पुढचा टप्पा समजण्यास हरकत नाही. त्याचे विश्लेषणही त्या पद्धतीने करता येते. औद्योगिक क्रांतीस उत्तर युरोपमध्ये प्रारंभ झाला. हॉलंड व इंग्लंड या देशातील व्यापारवाढ अगदी शिगेस पोहचली होती आणि तेथेच औद्योगिक क्रांतीस प्रारंभ झाला. या देशांतील व्यापाराचे जाळे फार दूरवर पसरले होते आणि व्यापार सतत वाढत राहावा म्हणून अखंड प्रयत्न चालूच होते. याकरिता नवनवीन उपक्रम कसे चालू करता येतील याचा शोध सतत घेणे आवश्यक होते. व्यापाराचे भौगोलिक क्षेत्र सतराव्या शतकात सारखे वाढतच गेले आणि अठराव्या शतकात अशा विस्तारास पुढे अवसरच राहिला नाही. याचे एक मूलभूत कारण म्हणजे युरोपबाहेरील देशांमधील व्यापार, युरोप मध्यवर्ती

नसल्यामुळे, तेथून नियंत्रित करणे कठीण होते. याला अपवाद म्हणजे आफ्रिका व अमेरिका यामधील गुलामांचा व्यापार व हिंदुस्तान व चीन यामधील अफूचा व्यापार. परंतु हे अपवाद नियमच सिद्ध करतात. व्यापार वाढावयाचा असेल तर निर्यात वाढविणे हाच एकमेव मार्ग होता आणि १९ व्या शतकात हेच मोठ्या प्रमाणात करण्यात आले. यामुळे उद्योगधंद्यास चालना मिळाली हे खरेच परंतु उद्योगधंद्याच्या मूलभूत स्वरूपात फरक का पडला, स्थिर भांडवलाची गुंतवणूक का वाढली हे प्रश्न चिंतनीय आहेत.

या प्रश्नाची विविध उत्तरे संभवतात. एक म्हणजे याच सुमारास अगदी सुयोग्य वेळी पैशाचे व्यवहार सुलभ झाले होते. व्याजाचे दर घटले होते हे तर खरेच परंतु मुख्य म्हणजे भांडवल मोठ्या प्रमाणात उपलब्ध होऊ लागले होते. त्याचे एक चिन्ह म्हणजे व्याजाच्या दरात झालेली घट. परंतु हे एक केवळ चिन्हच होते. फिरते भांडवल व्यापारी उलाढालीबरोबर परत परत आपल्या हातात येत असते. परंतु स्थिर भांडवल गुंतविले की ते कायमचे अडकून राहाते. फार तर हळूहळू ते परत मिळू शकते. याकरिता अनिश्चित परिस्थितीत स्थिर भांडवलाची गुंतवणूक वाढावयाची असल्यास लोकांना आवश्यक तेव्हा पैसे उपलब्ध होतील अशी व्यवस्था असली पाहिजे. याकरिता एक तर लोकांच्याकडे इतर साधनसंपत्ती असली पाहिजे किंवा त्यांना आवश्यक तेव्हा सहजा सहजी बँकतर्फे किंवा अन्य मार्गाने कर्जे मिळाली पाहिजेत. थोडक्यात म्हणजे रोकड पैसा सहजासहजी उपलब्ध असणे हे महत्त्वाचे ठरते. अठराव्या शतकाच्या पूर्वार्धात इंग्लंड, हॉलंड व फ्रान्समध्येही अशी अनुकूल परिस्थिती होती. निरनिराळ्या प्रकारचे रोखे विकण्याकरिता अनेक वित्तीयबाजार त्यावेळी उपलब्ध होते. तसेच द्रव्यवत मत्ता ( liquid assests ) त्यावेळी उपलब्ध होती. अशी परिस्थिती पूर्वी नव्हती. याच महत्वाच्या कारणाकरिता व्याजाचे दर घसरले होते. तत्कालीन पत्रव्यवहारात या वित्तीय बाजाराबाबत पुरावा मिळतो. उदाहरणार्थ स्विफ्टला एप्रिल १७३१ मध्ये लिहिलेल्या पत्रात गे म्हणतो : "लंडन सोडण्यापूर्वी तुझ्याकरिता चार टक्के व्याजाची साऊथसी किंवा इंडिया बिले घेण्याचा आदेश मी दिला आहे. ती बिले विकून तुला केव्हाही पैसे उपलब्ध होऊ शकतील."

अशा रीतीने उद्योगधंद्याच्या वाढीची काही अंशी केवळ अर्थशास्त्रीय मीमांसा करता येते परंतु त्यापासून आपले समाधान होत नाही. याबाबत अधिक सखोल विचार करणे आवश्यक आहे असे वाटू लागते. या सुमारास उद्योगधंद्यासाठी नवीन नवीन यंत्रसामग्री उपलब्ध होऊ लागली या घटनेचा

अनुक्रमणिका

विचार केला म्हणजे या प्रश्नाचा चांगला उलगडा होऊ लागतो. नवीन यंत्रांच्या निर्मितीचा मूलभूत आधार म्हणजे शास्त्रीय ज्ञान होय. आर्थिक विकास हा नवनवीन उपक्रमामुळे, साहसी योजनेमुळे, ज्ञानाच्या प्रगतीमुळे व अधिक गुंतवणुकीमुळे होतो हे निर्विवाद. प्रारंभी या उपक्रमांचे स्वरूप मुख्यत: भौगोलिक स्वरूपाचे होते. जगातील दूरदूरच्या देशातील नवीन व्यापारपेठा काबीज करणे हेच प्रारंभी विकासाचे साधन होते. परंतु यानंतर भौतिक जगाच्या व्यापक संशोधनामुळे आर्थिक विकास मुख्यत: होऊ लागला असे दिसून येते. शास्त्रीय विशेषत: पदार्थविज्ञान शास्त्रातील प्रगतीमुळे उद्योगधंद्याच्या विकासास मर्यादा अशी उरलीच नाही. उद्योगधंद्यांच्या विकासाच्या इतिहासाचा अधिकाधिक विचार केला म्हणजे हे अगदी सुस्पष्टपणे दिसून येते.

वाफेच्या इंजिनाचा शोध ह्या औद्योगिक क्रांतीतील मध्यवर्ती घटनेचा थोडा सखोल विचार केला पाहिजे. उष्णता आणि दाब यांच्या परस्पर संबंधाच्या पदार्थविज्ञानशास्त्रातील ज्ञानावर हा शोध आधारलेला आहे. पदार्थविज्ञान-शास्त्रज्ञांनी हे ज्ञान प्राथमिक स्वरूपात १६६० च्या सुमारास उपलब्ध केले होते. परंतु या संशोधनाचा अंशत: तरी उपयोग करणारे इंजिन तयार होण्यास काही तांत्रिक अडचणींमुळे शंभर एक वर्षांचा कालावधी लोटला. इतका काला-वधी लागण्याचे कारण म्हणजे वाफेच्या इंजिनाच्या निर्मितीकरिता दोन प्रमुख परस्पर विरोधी स्वरूपाचे तांत्रिक प्रश्न सोडविणे आवश्यक होते. प्रथम म्हणजे हे इंजिन वाफेच्या प्रचंड दाबामुळे फुटणार नाही इतके मजबूत असले पाहिजे व दुसरे म्हणजे त्याचबरोबर त्यातील फिरत्या भागांची हालचाल घड्याळातील यंत्राप्रमाणे अत्यंत सुसूत्र अशी असली पाहिजे. याकरिता दोन भिन्न प्रकारच्या ज्ञानांची, अनुभवाची व कौशल्याची आवश्यकता होती. त्यावेळी बंदुका तयार करणाऱ्या लोहारांना पहिल्या प्रश्नाचे उत्तर माहित होते तर घड्याळे तयार करणाऱ्या कारागिरांजवळ दुसऱ्या प्रश्नावर तोडगा होता. परंतु या परस्पर विरोधी तत्वांचा समन्वय कसा करावा हा प्रश्न अवघडच होता आणि साहजिकच याला बराच कालावधी लागला. यावेळी पदार्थविज्ञानशास्त्रातही मोठमोठ्या घडामोडी होत होत्या आणि प्रयोगशाळांकरिता लागणारीं निरनिराळ्या तऱ्हेची अत्यंत अचूक काम देणारी यंत्रे व उपकरणे तयार केली जात होती. वाफेच्या इंजिनाच्या निर्मितीकरिता या ज्ञानाचा प्रत्यक्ष अप्रत्यक्ष उपयोग झाला असावा. जेम्स वॅट ( १७३६–१८१९ ) याने ज्यावेळी वाफेच्या इंजिनातील कण्डेन्सरचा शोध लावला ( १७६९ ) त्यावेळी तो ग्लॅस्गो युनिव्हर्सिटीमध्ये "मॅथेमॅटिकल इन्स्ट्रुमेन्टमेकर" म्हणून काम करीत होता. (विद्यार्थ्यांना शिकविण्याकरिता

प्रयोगशाळेत असलेले " न्यूकॉमेन " या वाफेच्या इंजिनाचे छोटे मॉडेल दुरुस्त करण्याचे काम वॅटकडे आले आणि त्यामुळे वाफेच्या यंत्राकडे त्याचे लक्ष प्रथम वेधले. वीस वर्षे अविरत परिश्रम करून त्याने ते पूर्णत्वास नेले. ) ही तर केवळ सुरवात होती. अगदी प्रारंभीची यंत्रे हातानेच पाणचक्कीची मदत अनेकदा घेऊन तयार करावी लागत असे. अत्यंत कुशल कारागीर दुर्मिळ होते आणि त्याची मजूरीही भरमसाठ असे आणि ही यंत्रेही थोडी बहुत ओबडधोबड असत. त्यांची अचूकता मर्यादित असे आणि ती फार महाग असत. यानंतर यंत्रांचा उपयोग यंत्रे तयार करण्याकरिता होऊ लागला. यांत्रिक हत्यारांचा ( machine tools ) शोध हा एक औद्योगिक क्रांतीतील अत्यंत महत्वाचा दुवा होय. या हत्यारांच्या उपयोगामुळे यंत्रनिर्मिती सुलभ झाली, त्यामध्ये अचूकता आली आणि यंत्रे स्वस्त झाली. औद्योगिक क्रांतीस त्यामुळे जोरदार चालना मिळाली यात संशय नाही.

इंग्लंडमधील औद्योगिक क्रांतीचा विचार करताना कापडगिरण्यांचा इतिहास डोळ्यासमोर उभा राहतो आणि त्यामुळे क्रॉम्पटन आणि आर्कराइट या अलौकिक तंत्रज्ञाशिवाय ही औद्योगिक क्रांती होऊ शकली नसती असे वाटण्याचा संभव आहे. परंतु हा समज बरोबर नाही. कारण औद्योगिक क्रांतीचे मूळ शास्त्रीय ज्ञानाच्या प्रगतीमध्ये आहे. शास्त्रीय ज्ञानाच्या विकासामुळेच तंत्रज्ञाना नवीन शोध आला आणि त्यानी ऊर्जा निर्माण करण्याच्या अभिनव पद्धती प्रचारात आणल्या. उच्च प्रतीची वेगवान आणि अचूक अशी यंत्रे तयार होऊ लागली आणि या विविध तऱ्हेच्या यंत्रांचा अनेक कामाकरता उपयोग होऊ लागला. १८०७ मध्ये एका लेखकाने म्हटले की वाफेच्या यंत्राचा खर्च तितक्याच कामाकरिता लागणाऱ्या घोड्याच्या खर्चापेक्षा निम्म्याहून थोडासा अधिक एवढाच येतो. यामुळे यांत्रिकीकरणाचीही प्रक्रिया अखंड चालूच राहिली आणि यंत्रांचे अधिराज्य सर्वत्र पसरत गेले. अशा रीतीने स्थिर भांडवलाचा वाढता उपयोग होऊ लागला. औद्योगिक क्रांतीच्या यशाचे रहस्य म्हणजे यंत्रे माफक किमतीस मिळू लागली हे होय.

औद्योगिक क्रांतीचा श्रमबाजारावर काय परिणाम झाला हा अर्थशास्त्राच्या दृष्टीने अत्यंत जिव्हाळ्याचा प्रश्न आहे. इंग्लंडमधील औद्योगिक क्रांतीमुळे मजुरांच्या वास्तविक वेतनामध्ये वाढ झाली की नाही हा एक वादग्रस्त प्रश्न आहे. त्याची चर्चा इतिहासकारांमध्ये अद्यापि चालूच आहे. एवढे मात्र निश्चित की गेल्या शंभरएक वर्षात मजुरांच्या वास्तविक वेतनामध्ये औद्योगिक दृष्ट्या प्रगत अशा सर्व देशात डोळ्यात भरेल एवढी वाढ झालेली आहे. आणि ही वाढ औद्योगीकरणामुळे उत्पादनात झालेल्या प्रचंड वाढीचेच

फळ आहे हे उघड आहे. परंतु ही वाढ होण्यास वेळ का लागला हा प्रश्न महत्त्वाचा आहे. १७८० ते १८४० या औद्योगीकरणाच्या काळात वास्तविक वेतनात इंग्लंडमध्ये थोडीबहुत वाढ झाली का घट झाली हा प्रश्न सध्यातरी अनिर्णीतच आहे. परंतु यावरून एक गोष्ट स्पष्ट होती ती म्हणजे औद्योगी-करणानंतर लागलीच मजूरांचे वास्तविक वेतन वाढले नाही. आणि असे का झाले हाच खराखुरा महत्त्वाचा प्रश्न होय.

या प्रश्नाचे एक उत्तर असे सहज सुचते ते हे की १८ व्या शतकात इंग्लंड-मध्ये श्रमबाजारामध्ये कामगारांचा भरपूर पुरवठा उपलब्ध होता. जोपर्यन्त बेकारी होती तोपर्यन्त वास्तविक वेतनात वाढ झाली नाही हे साहजिकच होय. त्यावेळी लोकसंख्याही वाढत होती आणि शेतीमध्ये अधिक कामगारांना गुंतविणे शक्य नव्हते आणि त्यामुळे कारखान्यात व शहरात काम करू इच्छिणाऱ्या कामगारांची संख्या साहजिकच वाढत होती. या वाढत्या कामगारांच्या लोक-संख्येस काम पुरविण्याकरिता उद्योगधंद्यांच्या वाढीची आवश्यकता होती. या सर्व अतिरिक्त कामगारांना काम पुरविल्यानंतरच कामगारांच्या वास्तविक वेतनामध्ये वाढ होणे शक्य होते. यासाठी कामगारांकरिता असणारी मागणी कामगारपुरवठ्यापेक्षा अधिक वेगाने वाढणे आवश्यक होते. हे अर्थातच दीर्घकालीन काम होते.

नवीन यंत्रसामग्रीचा किफायतशीर उपयोग होत असल्याने उद्योगधंद्यात स्थिर भांडवल अधिक प्रमाणात गुंतविल्यास रोजगारीवर त्याचा काय परिणाम होतो हा एक ज्वलंत प्रश्न आहे; आणि तो प्रश्न साधासुधा नाही. अर्थशास्त्र-ज्ञांनी वेळोवेळी त्याची निरनिराळी उत्तरे दिली आहेत. श्रेष्ठ अर्थशास्त्रज्ञां-मध्येही त्याबाबत दुमत आहे. अर्थात यात आश्चर्य करण्यासारखे काहीच नाही. कारण परिस्थिती सतत बदलत असते आणि कालमानानुसार भिन्न भिन्न गोष्टी प्रभावी ठरतात.

यंत्रामुळे कामगारांवर बेकारीची आपत्ती अनेकदा येते यात संशय नाही. याचे एक उत्कृष्ट उदाहरण म्हणजे १८०१ मध्ये पोर्टस्माऊथ गोदीमध्ये मॉइस्लेच्या ब्लॉक तयार करणाऱ्या यंत्राचा वापर सुरू झाला आणि त्यामुळे १० अकुशल मजूर ११० कुशल मजुरांचे काम करू लागले. ( मॉइस्ले [१७७१ –१८३१ ] ह्या विख्यात यंत्रज्ञाकडे आदर्श असा लेथ प्रथम तयार करण्याचे श्रेय जाते ). अशा परिस्थितीत लुडाइटस् सारखे यंत्रविध्वंसक संप्रदाय पुढे यावेत हे साहजिकच होते. अर्थशास्त्रज्ञांना याची जाणीव होती परंतु कामगार

स्थलांतर करण्यास नाखुश असतात त्यामुळे ही आपत्ती ओढवते अशी त्यांची कारणमीमांसा होती. नवीन शोधामुळे एका ठिकाणी कामगारांची रोजगारी कमी होते परंतु ती दुसऱ्या ठिकाणी वाढते हे सहज दिसते. परंतु एकूण रोज-गारीवर काय परिणाम होतो हा प्रश्न उरतोच.

या प्रश्नाकडे केन्सच्या अर्थशास्त्रविश्लेषण पद्धतीतून विचार करावयाचा झाल्यास भांडवलाची सीमांत फलक्षमता ( marginal efficiency of capital ) लक्षात घ्यावी लागेल. नवीन शोधामुळे ही सीमांत फलक्षमता वाढते हे उघडच आहे नाहीतर शोध शोधच ठरणार नाही. आणि केन्सच्या विचारसरणीनुसार साकल्याने विचार करता रोजगारी वाढणार. परंतु ही वाढ प्रथम प्रथम होईल अशी अपेक्षा आपण करू शकतो परंतु तिचे कायमचे स्वरूप काय हा प्रश्न आहे.

नवीन यंत्रे आणि रेल्वेमार्ग यासारख्या स्थिर भांडवली वस्तूंची निर्मिती चालू असताना पतीवरील व्यवहार वाढत जाण्याचा संभव असतो आणि त्यामुळे पैशामध्ये मोजमाप केल्यास श्रमिकाकरिता येणारी मागणी वाढणार हे उघडच होय. परंतु ही यंत्रे एकदा का तयार झाली की बेकारीची आपत्ती कोसळणार अशी या प्रश्नाची दुसरी बाजू आहे. या दृष्टीने विचार केला तर केन्सची मीमांसा "लघुकालीन" च समजली पाहिजे. अनेक पिढ्यांच्या कालावधीचा विचार करता यंत्रांचा रोजगारीवर काय परिणाम होईल याचे उत्तर केन्सच्या अर्थशास्त्रात सुस्पष्ट असे आढळत नाही. आपल्याला या प्रश्नाचाच विचार येथे करावयाचा आहे.

परंतु या प्रश्नाची दीर्घकालीन समीक्षा अॅडम् स्मिथ व त्याचे अनुयायी या अभिजात अर्थशास्त्राच्या तत्कालीन प्रवर्तकांनी केलेली आढळते. त्यांच्याही दृष्टीने प्रथमदर्शनी एकूण परिस्थिती आशादायकच दिसते. तेजी व मंदी, पतीचा विस्तार व आकुंचन यांचा सम्यक विचार करून एकूण रोजगारीची प्रवृत्ती काय आहे ती पाहिली पाहिजे. याकरिता एका विवक्षित वास्तविक मजुरीच्या दराने श्रमिकाकरिता मागणी कशी बदलत गेली हे विचारात घेतले पाहिजे. याबाबत पुढीलप्रमाणे युक्तिवाद करता येतो. सर्वसाधारण आर्थिक विकास जितक्या द्रुतगतीने होईल तितक्या प्रमाणात श्रमिकाकरिता मागणी वाढत जाईल. भांडवलाच्या गुंतवणुकीशिवाय आर्थिक विकास अशक्य आहे. दीर्घकालीन विचार करता गुंतवणूक व बचत यामधील तफावत उपेक्षणीयच असते. तेव्हा बचत म्हणजेच गुंतवणूक असे म्हणता

येईल. तेव्हा आर्थिक विकासाची गती बचतीच्या गतीवर अवलंबून आहे असे म्हणता येते. बचत होते ती प्रामुख्याने नफ्यातूनच हे गृहीतकृत्य मान्य केल्यास ( आणि सर्वसाधारणपणे आणि सर्वत्र ते बऱ्याच अंशी खरेच आहे आणि इंग्लंडमध्ये औद्योगिक क्रांतीच्या कालखंडात ते निश्चितपणे खरेच होते ), जितका नफा जास्त, तितकी बचत जास्त असे म्हणता येते. शोधांमुळे फायदा वाढणार असेल तरच शोधांचा स्वीकार होतो. फायदा वाढला म्हणजे बचत वाढते व गुंतवणूक वाढून आर्थिक विकासाची गती वाढते. तेव्हा दीर्घकालीन सरासरीचा विचार करता आर्थिक विकासाबरोबर एकूण श्रमिकांकरिता मागणी अधिकच मोठ्या प्रमाणात वाढत जाईल.

वरील विवेचनात तथ्यांश आहेच परंतु ते विवेचन संपूर्णतः बरोबर नाही. तत्कालीन श्रेष्ठ अर्थशास्त्रज्ञांच्या लक्षात ही गोष्ट आलेली होती. रिकार्डोच्या 'प्रिन्सिपल्स' या ग्रंथाच्या पहिल्या आवृत्तीत ( १८१७ ) वरील प्रमाणेच आशावादी विवेचन केलेले आढळते आणि त्याच्या अनुयायांनी त्या विवेचनाचा मोठ्या उत्साहाने पाठपुरावा केला आणि ते नवीन भांडवलशाहीचे उद्‌गाते झाले. परंतु रिकार्डो हा धैर्यशाली आणि प्रांजल असा विचारवंत होता. आपल्या विवेचनातून तर्कशुद्ध निष्कर्ष काढण्यास तो कधीच कचरला नाही. त्याच्या हयातीत वरील ग्रंथाची जी शेवटची आवृत्ती १८२० मध्ये प्रसिद्ध झाली, त्यामध्ये "ऑन मशिनरी" असे एक नवीन प्रकरण त्याने घातले. त्यामध्ये या प्रश्नाचा उलगडा त्याने अधिक समाधानकारकरीत्या केला आहे.

श्रमिकांकरिता असलेली मागणी वास्तविक वेतन स्थिर आहे असे मानल्यास उद्योगधंद्यातील एकूण भांडवलावर अवलंबून नसून ती फिरत्या भांडवलावर अवलंबून असते. जोपर्यन्त स्थिर आणि फिरते भांडवल यांचे प्रमाण बदलत नाही तोपर्यन्त हा मुद्दा उपस्थित होत नाही. कारण हे प्रमाण स्थिर असल्यास फिरत्या भांडवलाच्या वाढीचा दर आणि एकूण भांडवलाच्या वाढीचा दर एकच असणार. अशा परिस्थितीत ज्यामुळे भांडवलाचा वृद्धिदर वाढतो त्याच कारणामुळे श्रमिकांकरिता असणाऱ्या मागणीचा वृद्धिदरही वाढू लागतो. परंतु खरा प्रश्न निराळा आहे हे रिकार्डोने ओळखले होते. जर स्थिर भांडवलामध्ये अधिक भर पडू लागली आणि त्यामुळे सर्व भांडवलाचा वृद्धिदर वाढला तर फिरत्या भांडवलावर दुहेरी परंतु परस्पर विरोधी परिणाम होतात. जर स्थिर भांडवलामध्ये प्रकर्षाने वाढ होऊ लागली तर एकूण भांडवलाचा वृद्धिदर वाढेल पण फिरत्या भांडवलाचा वृद्धिदर कमी होणे अगदी सहज शक्य आहे. अशा रीतीने नवीन शोधामुळे श्रमिकांकरिता असणारी मागणी थंडावते आणि

हा परिणाम केवळ संबंधित श्रमिकापुरताच मर्यादित नसून तो सर्व अर्थव्यवस्थेत जाणवतो.

केन्सच्या विचारसरणीमुळे आपण असे मानतो की बचतीशी तुलना करता जर गुंतवणुकीमध्ये वाढ झाली तर रोजगारी वाढते. वरील विवेचन या निष्कर्षाच्या विरुद्ध आहे आणि त्यामुळे ते संशयास्पद वाटते. परंतु ह्या दोन्ही निष्कर्षांची सत्यासत्यता परिस्थितीवर अवलंबून आहे. केन्सच्या विचारसरणीवर मंदीची दाट छाया पडलेली होती. मंदीच्या काळात निरनिराळ्या प्रकारचा माल मोठ्या प्रमाणात पडून राहिलेला असतो. त्याच्या वापराकरिता अनुकूल परिस्थिती उपलब्ध नसते. त्यामुळे श्रमिकाकरिता असणारी मागणी व फिरते भांडवल यामधील दुवाच तुटून जातो. परंतु ही परिस्थिती अपवादात्मकच समजली पाहिजे कारण त्यामध्ये सर्वसाधारणतः दुवा असतोच. तेजीचा अगदी भर असलेल्या अल्प कालावधीमध्येही हा दुवा असतो. दीर्घकालाचा विचार केल्यास हा दुवा तर असतोच असतो. कधी त्यामध्ये शिथिलता दिसते तर कधी तो पक्का असतो. परंतु एकूण काही वर्षांची सरासरी विचारात घेतली तर असा दुवा निश्चितच असतो.

इंग्लंडमध्ये एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या पंचवीस ते तीस वर्षांच्या कालावधीत वर विवेचन केल्याप्रमाणे नवीन शोधांमुळे श्रमिकांकरिता असलेल्या मागणीवर प्रतिकूल परिणाम झाला असावा असे मानण्यास भरपूर अवसर आहे. नेपोलियन बरोबरच्या युद्धामुळे व परराष्ट्रीय व्यापारामध्ये आलेल्या अडचणींचा विचार येथे केलेला नाही. तरीही अशा रीतीने श्रमिकांकरिता असलेल्या मागणीमध्ये त्याकाळात थोडी कमतरता भासू लागली असली आणि वाढत्या लोकसंख्येमुळे एकूण कामगारांचा तुटवडा असा सर्वसाधारणतः भासलाच नाही व त्यामुळे या काळात मजुरांचे वास्तविक वेतन वाढू शकले नाही. परंतु स्थिर भांडवलाच्या वाढीमुळे वास्तविक वेतनावर होणारा प्रतिकूल परिणामही निरंतर चालू राहात नाही आणि कालांतराने वाढीव वृद्धिदराचाच अनुकूल परिणाम दिसून येईल अशी रिकार्डोची अपेक्षा होती. रिकार्डोने आपल्या ग्रंथात म्हटले आहे :

"नवीन सुधारलेल्या यंत्रामुळे वास्तविक निव्वळ उत्पन्न ( फायदा + भाडेपट्टी ) यामध्ये झालेल्या वाढीमुळे बचत व संचय यामध्ये वाढ होते. ही बचत दरवर्षी होत असल्यामुळे, त्यातून निर्माण होणारा निधी यंत्राच्या शोधामुळे प्रथम कमी झालेल्या एकूण उत्पन्नापेक्षा ( मजूरी + फायदा +

भांडवल) कालांतराने अधिक होतो आणि त्यावेळी श्रमिकाकरिता मागणी पूर्वीइतकीच येऊ लागते आणि वाढत्या निव्वळ उत्पन्नामुळे बचतीचे प्रमाण वाढून लोकांची परिस्थिती अधिकच सुधारते."

हे विवेचन काही अंशी बरोबर आहे परंतु तेही संपूर्णतः बरोबर आहे असे म्हणता येत नाही. रिकार्डोच्या विवेचनात असे गृहीत धरले आहे की स्थिर भांडवल गुंतविण्याची प्रक्रिया एकदाच होते. परंतु असे का व्हावे ? ही प्रक्रिया सतत चालू राहू शकते. अशी प्रक्रिया चालू राहण्यास एक कारण आहे. नवनवीन यंत्रसामग्री उपयोगात येऊ लागल्याचे कारण म्हणजे यंत्रनिर्मितीचा खर्च कमी होऊ लागला, यंत्रे स्वस्त झाली व त्यामुळे हाताने काम करण्याऐवजी यांत्रिक पद्धतींचा अवलंब करणे फायदेशीर होऊ लागले आणि ही प्रक्रिया सतत चालूच राहिली व त्यामुळे यंत्रे अधिकाधिक स्वस्त व कार्यक्षम होऊ लागली. याचा एक परिणाम असा की यांत्रिक पद्धतींचा उपयोग नव्या क्षेत्रांत होऊ लागला. दुसरा परिणाम असा झाला की प्रथम उपयोगात आणलेली जुनी यंत्रसामग्री काढून टाकून त्याऐवजी नवीन अधिक चांगली व स्वस्त यंत्रसामग्री उपयोगात आणण्याची प्रवृत्ती वाढली. यामुळे बचत न वाढविता नफा वाढविणे शक्य होऊ लागले. प्रथम एकदा स्थिर भांडवलाचा संचय केल्यानंतर ( आणि हे काम त्रासदायक आणि कष्टाचे आहे हे मान्य केलेच पाहिजे ) तांत्रिक प्रगतीमुळे त्याची उत्पादकता वाढत जाते आणि त्यानंतर बचत करावी लागत नसल्यामुळे श्रमिकाकरिता येणाऱ्या मागणीवर तिचा अनुकूलच परिणाम होतो. याच सुमारास अतिरिक्त श्रमिकांना रोजगारी मिळू लागते आणि वास्तविक वेतन त्यानंतर निश्चितपणे वाढू लागते हीच या प्रश्नाची खरी मख्खी होय.

सध्याच्या साकलिक अर्थशास्त्राच्या परिभाषेत सर्वसाधारण वेतन पातळीच्या अन्वयार्थाने बोलावयाचे म्हणजे वरील विवेचनात या प्रश्नाचे मर्म साठविलेले आहे. परंतु याच्याही पुढे थोडा दृष्टिक्षेप टाकल्यास श्रमबाजारामध्ये एक महत्त्वाचा फरक झालेला आढळून येतो.

कामगारवर्गामध्ये यावेळी वर्गीय जाणीव निर्माण होऊ लागली हे जरी खरे असले तरी औद्योगीकरणाचा कामगारवर्गातील निरनिराळ्या समूहावर भिन्न भिन्न परिणाम झाला. कारखान्यात काम करणारा मजूरांचा एक नवीनच वर्ग अस्तित्वात येऊ लागला. नागरी विभागात काम करणाऱ्या मजुरापेक्षा त्याचे स्वरूप भिन्न होते. कारखान्यातील कामगारांचे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांची रोजगारी नियमित स्वरूपाची असते.

अनुक्रमणिका






उद्योगधंद्याना तेजीमंदीस तोंड नेहमीच द्यावे लागते त्यामुळे कामगारांना बेकारीचे भय भेडसावीत असतेच. परंतु असे असले तरी कारखान्यामध्ये रोजगारी मिळाली म्हणजे ती बऱ्याच अंशी नियमित स्वरूपाची असते. याच्या विरुद्ध नैमित्तिक कामगारास उद्याची शाश्वती असते. औद्योगीकरणापूर्वी कामगारवर्गाची रोजंदारी नैमित्तिक स्वरूपाची होती. याच्या विरुद्ध औद्योगिक कामगारांची परिस्थिती अगदी निराळी होती. औद्योगीकरणाच्या प्रारंभीच्या काळात कामगारांना अनेक हालअपेष्टा सहन कराव्या लागल्या हे जरी खरे असले तरी नियमित स्वरूपाची रोजगारी त्याना मिळाली हा फार महत्वाचा फायदा होता.

आधुनिक उद्योगधंद्यांचा नियमितपणा हा स्थायी भाव होणे अपरिहार्य होते कारण असे उद्योगधंदे स्थिर भांडवलाच्या उपयोगावर अवलंबून असतात. नवीन यंत्रसामग्री नियमितपणे उपयोगात आणली तरच ती फायदेशीर ठरते. ती नियमितपणे उपयोगात आणण्याकरिता कायम स्वरूपाच्या संघटनेची आवश्यकता असते आणि अशा संघटनेतील कामगारांची रोजगारीही कमी अधिक प्रमाणात कायम स्वरूपाची असणे अपरिहार्य ठरते. याचे आर्थिक आणि सामाजिक परिणाम दूरगामी स्वरूपाचे ठरले.

औद्योगिक क्रांतीपूर्वीचे कामगार अगदी निराधार होते तर औद्योगिक कामगार संघटित होऊ लागले आणि त्याना आपल्या संघटनेचा आधार मिळू लागला ह्या संघटनांना समाजामध्ये एक विशिष्ट स्थान प्राप्त होऊ लागल्यामुळे त्याचा कामगारांच्या जीवनावर दूरगामी परिणाम झाला. फार पूर्वी खेड्यामध्ये कामगारांचे गट असत आणि त्याचा कामगारांना आधार मिळे. तशीच थोडीबहुत परिस्थिती औद्योगिक क्रांतीमुळे पुन्हा निर्माण होऊ लागली. औद्योगिक संस्था कायम स्वरूपाच्या असल्यामुळे कामगारांना थोडेबहुत स्थैर्य त्याच्या संघटनेशिवायही आपोआपच प्राप्त झाले. औद्योगिक कामगार संघटित अशा संस्थेमध्येच काम करीत असल्यामुळे त्याना संघटनेचे फायदे कळू लागले आणि ते संघटित होऊ लागले. औद्योगिक संघटनांना आर्थिक अरिष्टांना तोंड द्यावे लागते व त्याचे परिणाम कामगारांनाही भोगावे लागतात व तसेच वैयक्तिक स्वरूपाचे अन्याय होण्याची धास्ती नेहमी असतेच. या अडचणींना तोंड देता यावे म्हणून कामगार एकत्र येऊन त्यानी सांघिक सौदा-पद्धतीचा अवलंब करण्यास सुरवात केली. कामगारसंघटना मालकांच्याही दृष्टीने सोयीच्या ठरल्या. या संघटनांमुळे संपाचे एक नवीनच हत्यार कामगारांना

उपलब्ध झाले. मोठ्या उद्योगधंद्यावर आधारलेल्या नवीन समाजव्यवस्थेमुळे कामगार संघटना आणि मजूर पक्ष उदयास आले.

पूर्वी नमूद केलेल्या सांकलिक अर्थशास्त्रीय विवेचनामध्ये कामगार संघटनेमुळे काय परिणाम होतात याचा विचार झालेला नाही. औद्योगिक कामगार जसजसे संघटित होऊ लागले तसतशी नैमित्तिक कामगारांच्या तुलनेने त्यांची परिस्थिती अधिक लवकर सुधारू लागली. संघटित कामगारांच्या वेतनामध्ये सर्वसाधारण बेकारी थोडीबहुत असतानाही सुधारणा होऊ लागली. आणि बेकारीचे प्रमाण जसजसे कमी होऊ लागले तसतसे उरलेले नैमित्तिक कामगारही संघटित होऊ लागले आणि जनरल वर्कर्स् युनियन्स, ट्रेड बोर्ड वगैरे संघटना निर्माण झाल्या. अशा रीतीने संघटनेमुळे वेतनामध्ये सुधारणा झाली परंतु हेही अंशत:च खरे आहे.

उद्योगधंद्यावर आधारलेल्या समाजरचनेमुळे श्रमव्यापारपेठेवर ब्रिटनमध्ये काय परिणाम झाले हे आपण पाहिले परंतु हा प्रश्न आता जागतिक स्वरूपाचा आहे आणि तसा त्याचा विचार केला पाहिजे. ब्रिटनमध्ये जवळ जवळ सर्व श्रमिकवर्ग औद्योगिक कामगार म्हणून आज काम करीत आहे आणि ही प्रक्रिया इतर सर्व विकसित देशामध्ये जवळ जवळ पूर्ण झाली आहे. परंतु सर्व जगाचा विचार केला तर ही प्रक्रिया अपूर्ण आहे इतकेच नव्हे तर तिची विशेष प्रगतीही झालेली दिसत नाही.

याला अंशत: वाढती लोकसंख्या हे एक कारण आहेच. युरोपमध्ये सुमारे शंभर वर्षापूर्वी लोकसंख्येत प्रचंड वाढ झाली त्याची कारणमीमांसा निश्चितपणे करता आली नाही तरी आज लोकसंख्येची जी प्रचंड वाढ होत आहे त्याची कारणमीमांसा आपण करू शकतो. लोकसंख्येच्या वाढीस काही प्रतिबंध नसेल तर लोकसंख्येत मोठ्या प्रमाणात वाढ होईल हा माल्थसचा सिद्धांत खराच आहे पूर्वी काही विघातक रोगामुळे लोकसंख्या आपोआप मर्यादित ठेवली जाई परंतु आज शास्त्रीय प्रगतीमुळे या रोगांचे निर्मूलन करणे शक्य झाले आहे. उदाहरणार्थ मलेरियासारख्या विघातक रोगास अत्यंत यशस्वी रीतीने पायबंद घालण्यात आला आहे. अन्नाच्या टंचाईमुळे लोकसंख्या कमी होईल असे माल्थसचे भाकित होते तेही शास्त्रीय प्रगतीमुळे चुकीचे ठरले आहे. एकूण जगाचा विचार करता अन्नधान्याची पैदास इतक्या प्रमाणात वाढली आहे की मोठे असे दुष्काळ आता पडतच नाहीत. ( काही विवक्षित प्रदेशात काही ठराविक कारणाकरिता पडणारे

दुष्काळ येथे विचारात घेतलेले नाहीत.) परंतु शेतीचे उत्पन्न जरी वाढले तरी त्या प्रमाणात शेतमजुरांची संख्या वाढलेली नाही. उलट शेतमजूर कमीच झाले आहेत. इतके असून एकूण सर्व जगाचा विचार करता अन्नधान्य गरजेइतके निर्माण होत आहे. परंतु वाढत्या लोकसंख्येबरोबर उद्योगधंद्याबाहेरील नागरी क्षेत्रात काम करणाऱ्या श्रमिक वर्गाचीच वाढ होत आहे.

अर्थात अशी परिस्थिती १९ व्या शतकात लंडन, पॅरिस किंवा बर्मिंगहॅम यासारख्या शहरी होती पण आता तेथे आढळत नाही. ही परिस्थिती मुंबई, कलकत्ता, कॅन्टन वगैरे विकसनशील देशातील शहरात प्रकर्षाने आढळते. केवळ आपले नशीब काढण्याकरिता शहरात नोकरी करावयाची म्हणून लोक शहरांकडे वळत आहेत असा प्रकार आता उरलेला नाही. शिक्षणामुळे लोकांच्या आकांक्षा उंचावल्या. नवीन प्रकारचे काम आपल्यास मिळावे अशी अपेक्षा निर्माण झाली. राजकारणी लोकांच्या व अर्थशास्त्रज्ञांच्या प्रचारामुळे आर्थिक विकासास एका मानवी हक्काचेच स्वरूप प्राप्त झाले आहे. स्वातंत्र्यानंतर आपल्या सर्वांना चांगल्या नोकऱ्या देण्याची सरकारची जबाबदारी आहे अशी भावना निर्माण झाली आहे. लक्षावधी लोक उद्योगधंद्यांची दारे नोकरीकरिता ठोठावीत आहेत असे विकसनशील देशात आज मोठ्या प्रकर्षाने दिसते. विकसित देशात एकोणिसाव्या आणि विसाव्या शतकात जे साध्य झाले ते विकसनशील देशात आता का होऊ नये असा प्रश्न हे लोक साहजिकच विचारतात. लक्षावधी लोकांना नोकऱ्या द्यावयाच्या म्हणजे प्रचंड प्रमाणात उद्योगधंद्यांचा विस्तार करणे आवश्यक आहे. विसाव्या शतकातील शास्त्रीय व तांत्रिक प्रगती आणि आधुनिक उद्योगधंद्याची विस्तारक्षमता लक्षात घेता हे काम अवाढव्य असले तरी अशक्य कोटीतील आहे असे म्हणता यावयाचे नाही.

जागतिक इतिहासाचे विहंगावलोकन केले तर त्याची शक्यता लक्षात येते. दोनशे वर्षापूर्वी औद्योगिक कामगार वर्ग असा अस्तित्वातच नव्हता. शंभर वर्षापूर्वी त्याची लोकसंख्या काही दशलक्ष इतकीच होती तर आज ती फार मोठी आहे. उद्योगधंद्यांत समाविष्ट असलेल्या लोकांची मोजदाद करताना प्रत्यक्ष कारखान्यात उत्पादन करणाऱ्या लोकांबरोबर त्याना साहाय्य करणाऱ्या पांढरपेशा वर्गातील लोकांचाही विचार केला पाहिजे. औद्योगीकरणामुळे शेतकरीवर्गापैकी काहींच्या कामाचेही स्वरूप बदलून गेले आहे त्यांचाही यात अंतर्भाव केला पाहिजे. या सर्व लोकांची कुटुंबीय मंडळी व अशाच क्षेत्रात काम करणाऱ्या विकसनशील देशातील लोकांचाही यात अंतर्भाव केला पाहिजे. या

सर्व लोकांची संख्या सुमारे ५०० दशलक्ष इतकी भरेल. चीनच्या लोकसंख्येपेक्षा ही लोकसंख्या कमी आहे. भारताची लोकसंख्या जवळ जवळ एवढीच आहे. ती जगाच्या लोकसंख्येच्या सुमारे एक षष्ठांश भरते. उद्योगधंद्याच्या क्षेत्रात समाविष्ट करून घ्यावयाची ही लोकसंख्या फारच अफाट आहे. आजपर्यंत समाविष्ट करून घेतलेली लोकसंख्याही मोठी आहे. आजपर्यंत ज्या वेगाने उद्योगधंद्याच्या क्षेत्राचा विस्तार होत गेला तो लक्षात घेतला तर काही पिढ्यांमध्ये हे कार्य होण्यास हरकत नाही. त्यापेक्षा अल्पकाळात ते होणे तर केवळ अशक्यच आहे. परंतु वाढत्या लोकसंख्येमुळे ते काम अशक्य नसले तरी अधिकच बिकट ठरणार आहे. कवी म्हणतो–

God hath wrought things as incredible
For his people of old; what hinders now?

मला मात्र अशी भीती वाटते की हे सहजासहजी साध्य होणार नाही.





अनुक्रमणिका





डॉ० सुरेश म० डोळके

# श्रीचक्रधरानिरूपित (?) 'संपूर्ण' श्रीकृष्णचरित्र : ३ :

## [ संहिता : लेखांक २ ]

राजसूयअग्रपूजाप्रसंगें सीसूपाळवध–कथन :।। ।।

एकु दी : महदाइसी पुसिलें : "जी जी : शीसूपाळ कवणें प्रकारें वधीला ते नीरोपीजे जी :" सर्वज्ञें म्हणितलें : "यूधीष्ठीरें राये राजसूययज्ञ आरंभीला : दूर्योधनासि मूळ पाठवीलें : दूर्योधन सपरीवारेंसी आला : मग यूधीष्ठीरें दूर्योधनासि जळस्थळें दाखवीली : तेथ राजपूत्र जळकेळी खेळत असति : ऐसें देखौणि दूर्योधनें जळ म्हणौनि ऊडी घातली : तेणें तयाचे गूढघे– कोपर फूटले : ते देखौणि राये मूल्य करूणि समस्त सैन्य हासीन्नलें : मग : कव्हणी ओकी ठाइ स्थळम्हणौनि भीतर रीगो बैसला : तंवं ऊदकांत ऊडी पडीली : वस्त्रें वोली जाली : तंवं द्रौपदी हासीली : ऐसा दूर्योधनाचेंया चातूर्याचा ऊपहास जाला : थोर लाजीला : यूधीष्ठीरें दूर्योधनासी संबोखीलें : मग : यूधीष्ठीरें रुत्वीज पाचारूणि यज्ञ आरंभीला : मग यूधीष्ठीरें श्रीकृष्णचक्रवर्त्तिसि म्हणितलें : 'जी जी : जयासि जो व्यापारु तो तयासि दयावा : मज यज्ञदीक्षेचें कांकण असे : तेणें मज यागाजवळुणि जावो न ये' : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति येकैकासि ओकैक ऊल्लींग दीधलें : आपण वाढायाचें उल्लींग घेतलें : दूर्योधनासि द्रव्य वेचावयाचें उल्लींग दीधलें : मा दूर्योधन धर्माचें द्रव्य म्हणौनि कवडा न लाहे तयासि लक्ष्यवेऱ्ही दे : ऐसें दूर्योधनासि द्रव्य वेचीता न सरे : आधीकाचि वाढे : सूवर्णाचीया राशी जैसीयातैसीयाचि पडलीया होतीया : दूर्योधनाचा हाती नीद्धि होती : तो जीये रासीसि हात लावी तरि (ते) द्रव्य वाढोचि लागे : ते तो नेने : ऐसीयापरी धर्माचीया यागाची पूर्णाहूति जाली : मग यूधीष्ठीरें अग्रपूजा मांडली : तेथ अठ्यासीसहस्र ऋषी : आनि समस्त राये बैसले होते : आन समस्त कूळीचे राये : रायारायाचे कूमर बैसले होते : यूधीष्ठीरें ओऊनि हात

जोडुणि पूढा ऊभा ठाकला : समस्तातें भणितलें : 'माझा यज्ञ सीद्धी पावला : आता अग्रपूजा कवणासि करावी ते आज्ञापीजो' : तेव्हळि तेही अवघाचि ऋषी वीचारीलें : 'सूकदेवो ज्ञांनिया होये : आन तपोवृद्ध होये : तो पूर्ण योग्य होये : तयासी अग्रपूजा करावी : तरि तो बोलावा' : तेव्हळि सूकदेवो लेकुरुवांत ऊभा ठाकौणि श्रीकृष्णचर्वात्तिचीया लीळा पाहात होता : अवघा तयातें बोलाऊ पाठवीलें : तैसाचि सूकदेवो आला : बैसकारु दीधला : अवघा सूकदेवातें भणितलें : 'तूम्ही अग्रपूजा अंगीकरावी' : तेव्हळि शूकदेवो भणितलें : 'हे काइ : हे अवघे असता आम्हासि अग्रपूजा काइसी ?' : तेव्हळि तेही अवघा आपुली व्यवस्था सांघीतली : आपुली वीवक्षा केली : जो बाळब्रह्मचारी आन ज्ञानी असैल : तयासि अग्रपूजा : आम्हामाजी बाळ-ब्रह्मचारी कव्हणी नाही : शूकदेवें भणितलें : 'मी ज्ञांनिया आन बाळब्रह्मचारी अैसें तूम्ही नीर्द्धारीलें : तरि मी ज्ञांनिया बाळब्रह्मचारी नव्हे' : अवघा भणितलें : 'हे अैसें काइ ! : तरि अग्रपूजा कवणासि करावी ?' : शूकदेवे भणितलें : 'अवघेयांत तूम्ही मज प्रमाण मानीलें : तरि मी नीर्द्धारीन ते तूम्ही मानाल ?' : समस्ती भणितलें : 'अवश्यमेव' : शूकदेवें भणितलें : 'सकळज्ञा-नियांसीरोमणी : सकळ ज्ञानियाचा बापु : हा श्रीकृष्ण असे : तरि यासी अग्रपूजा करा का' : मग समस्ती ऋषी भणितलें : 'तूचि ज्ञानी होसि' : हे आइकौणि दूर्योधनादीक क्षोभले : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति श्रीकरी कनकाचे भाजन घेऊनि ब्राह्मणाऋषीसि क्षीर वाढीत होते : इतूकाले श्रीकर अन्नें भाखले होते : श्रीकराचा अनूकार : आंगीचीया बाहीया वरूतीया खोवीलीया होतीया : मोकळे केश : कटीप्रदेशी फूटा : यूधीष्ठीरें श्रीकृष्णचक्रवर्त्तितें बोलाऊ पाठवीलें : तैसेचि श्रीकृष्णचक्रवर्त्ति तेथ बीजें केलें : समस्त ऋषी श्रीकृष्ण-चक्रवर्त्तितें भणितलें : 'जी जी : तूम्ही अग्रपूजा अंगीकारावी' : श्रीकृष्णचक्र-वर्त्ति भणितलें : 'तूम्ही अवघे ऋषी असता अेथ अग्रपूजा काइसी ?' : तेव्हळि समस्ता ऋषी अवघी व्यवस्था सांघीतली : श्रीकृष्णचक्रवर्त्ति नीरा-करीलें : मग समस्ती ऋषी प्रार्थूनि भणितलें : 'आगा ये कृष्णा : तू सर्वज्ञ : पूर्ण ब्रह्म : आमतें काइसया झांकवीतासि' : भणौनि समस्ती ऋषी श्रीकृष्ण-चक्रवर्त्तिची स्तूति केली : मग श्रीकृष्णचक्रवर्त्तिसि यज्ञमंडपी आसन रचीलें : श्रीकृष्णचक्रवर्त्ति श्रीकर धोवौनी आसनी प्रतिष्ठिले : मग यूधीष्ठीरें मंगळमहोत्सायेसी श्रीकृष्णचक्रवर्त्तिची अेथोचीत अग्रपूजा केली : श्रीकृष्ण-चक्रवर्त्ति यज्ञमंडपी बैसौणि अग्रपूजा स्वीकरीली : मग यूधीष्ठीरें यथक्रमें ऋषीमनीदेवदानवराजे पूजीले : अैसा समयी तेथ शीसूपाळ आला : मा

तो श्रीकृष्णचक्रवर्त्तिसि सवीया देवो लागला : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्ति तयाचीया शतभरि सवीया साहीलीया : ऐकि आगळी जाली : आनि सूदर्शन प्रेरूणि सीसूपाळाचें शीर छेदीलें : मा शीरकमळ यागी पडीलें : आन तयाचें देह बाणवेन्हीं पीटौणि यागी घातलें : आन हाहाकारु प्रवर्त्तला : रायारायाची सैन्ये ऊठावली : यूध्यालागी राजे चालीले : मग यादवी-पांडवी सकळ राजे पराभवीले : अैसा श्रीकृष्णचक्रवर्त्ति धर्माचा याग सीद्धी नेला : मग देव ऋषी राजे आपूलालेंया देशासि गेले : मग दूर्योध [न*] आज्ञा घेऊनि आपूलीया नगरासि गेला : श्रीकृष्णचक्रवर्त्ति यूधीष्ठीरा कूंतीयेतें पुसिलें : 'हे आपूलीया नगरासि जाइल : शाल्वें माहादेवो प्रसन्न केला असे : तेनें द्वारका वेढीली असे : तेरा दीवस माहामार होताये : प्रद्यूम्ण गावी अेकला असे : अेथौनि जावेंचि लागैल !' : मग श्रीकृष्णचक्रवर्त्तीसि समस्त बोळवीत नीगाले : मग द्रौ[प*]दीया देवकीयेदेवीसि नमस्कार केला : अेरी सकळी द्रौपदीयेसि नमस्कार केला : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति सपरीवारें गरूडावरि बैसौणि द्वारकेसि बीजें केलें : § तेथ शाल्व वधीला : शाल्वाचेनि कैवारें दंतवक्रें आन कळींगें चालि केली : ते दोघै : श्रीकृष्णचक्रवर्त्ति वधीले : मग सीसूपाळा- कळींगा जयवीजयाचें पद दीधलें : मग सीसूपाळाचेनि वीदूरथ चालीला : तेनें श्रीकृष्ण-चक्रवर्त्तीसि सा मास यूध्य केलें : तो श्रीकृष्णचक्रवर्त्ति बहूता कष्टी वधीला : इतूकेनि देवी पूस्पवर्षाव केला : श्रीकृष्णचक्रवर्त्ति जयवादी जाले : बाइ : श्रीकृष्णचक्रवर्त्ति प्रथम पूतना वधीली : अंती वीदूरथ वधीला : अैसे श्रीकृष्णचक्रवर्त्ति नीं:कंटक करूणि ऊग्रसेनासि राज्य दीधलें" : ॥ ८० ॥

यूधीष्ठीर द्यूतक्रीडे द्रौपदीये वस्त्राहरण– कथन :॥ ॥

एकु दी : महदाइसी पुसिलें : "जी जी : दूर्योधनें द्रौपदीची वस्त्रें का हरीली ?" : सर्वज्ञें म्हणितलें : "बाइ : यज्ञमंडपी दूर्योधनाचीया चातूर्याचा ऊपहास जाला : तेथ द्रौपदी हासीली :" महदाइसी भणितलें : "जी जी : ते कथा नीरोपावी :" सर्वज्ञें म्हणितलें : "बाइ : इंद्रप्रस्थी यूधीष्ठीरा राज्य करीता : यूधीष्ठीरें अभीमन्यालागी बळिभद्रांची कन्या नामें वत्सळा मागीतली : मग : श्रीकृष्णचक्रवर्त्ति बळिभद्रीं अभीमन्यासि कन्या देवो केली : वाग्णीश्चयो जाला : मग : सहादेवो इंद्रप्रस्थासि आला : मग : मासायेका दूर्योधनें पांडवातें बोलाऊ पाठवीलें : बरवा आदर केला : तंव दूर्योधनाचा सकूनी मामा : तेणें

§ इथून पुढला भाग कै. वि. ल. भावे यांनी छापलेल्या लीळेत नाही. [ 'महाराष्ट्र- सारस्वत', भाग पहिला, आ. तिसरी, शके १८४६].

कपटफांसे केले : मग दूर्योधनें यूधीष्ठीरातें भणितलें : 'राजेहो : या न गमे : तरि सारीपाट खेळो .' भणौनि यूधीष्ठीर दूर्योधनेंसी जु खेळो लागला : पहीलेनि डावें यूधीष्ठीरें राज्य हारवीलें : दूसरेनि सत्य हारवीलें : तीसरेनी चौघें बंद्धू हारवीले : चौथेनि आपणपे हारवीलें : पाचवेनि द्रौपदी हारवीली : साहावेनि बारा वर्षें वनवासु अंगीकरीला : मग : दूर्योधनें द्रौपदी दूश्यासनाकरवी बांधौणि आनवीली : तेणें आनीली : दूर्योधनें भणितलें : 'ये दूसरी बैस माझीये जानूवरि' : द्रौपदीया भणितलें : 'आरे मूर्खा मी पतीवृत्ता : मज अैसें बोलतासि तरि तूझीये जानूवरि बैसो काळमाहाकाळ वडवडीत वडवानळ : आन माझीया भीमसेनाची गदा' : अैसा द्रौपदीया श्यापु दीधला : मग दूर्योधनें कोपौणि भणितलें : 'हारे हीरा इची वस्त्रें' : मग दूश्यासन वस्त्र हीरो लागला : वस्त्राचीया राशी जालीया : दूश्यासनाचे हात राहीले : मग दूर्योधनें भणितलें : 'पाहारे इयेचा अंत' : मग द्रौपदीया पांडवाची वास पाहीली : तंवं यूधीष्ठीरें खालूती मान केली असे : तंवं यूधीष्ठीराची वास अर्जूनें भीमसेनें पाहीली : ते दोघै यूधीष्ठीरें वर्जीले : मग द्रौपदीया भीस्माद्रोणाकृपाचार्या– वीदूराची वास पाहीली : तेही दूर्योधनासि बहूता प्रकारें भणितलें : तयाचें भणितलें तो नाइकेचि ! : मग द्रौपदीया श्रीकृष्णचक्रवर्त्तिचें चींतन केलें : श्रीकृष्णचक्रवर्त्ति सूदर्शन श्रीकरी घेऊनि द्रौपदीचा पाठीसी अदृश्य ऊभे राहीले : ते भीस्में देखीले : मग दूर्योधनातें भणितलें : 'आरे मूर्खा सींहाची स्त्री जंबूका वरिपडी होअे : तैसी द्रौपदी तूम्हा वरपडी जाली : आता द्रौपदीसि सोडि : इयेसि श्रीकृष्णा-सारीखा सारथी असे : हे मा सती : हे काइ कव्हणा गांजवत असे ? : आता इयेचा अंत पाहासील तरि अेचि क्षेणी श्रीकृष्णाचेनि हातें मृत्य पावसी : यासी अन्येथा असे तरि गंगेची आन' : मग दूर्योधनें द्रौपदी सोडीली : मग द्रौपदीया भीस्माद्रोणातें भणितलें : 'आता : यूधीष्ठीरें राये मज हारवीलें नाही : आजि मी भीमसेनाची भार्या : आजि मज रायासि हारवया आर्हता नाही : तरि आमचे हारिफळ असे ते देयावें' : मग दूर्योधनें भणितलें : 'हे पाहो पांग : हेचि काइ करील ? :' मग द्रौपदीया हाती फासे घेतले : मग दूर्योधनातें भणितलें : 'आता डावो बोडवी' : मग दूर्योधनें पाचही पांडव : आन सत्य : आन तीतेंचि बोडवीलें : द्रौपदीया फांसे ढाळीले : तंवं ते फांसे आले : डावो पडीला : सत्य सोडवीलें आपणयासहीत पाचातें सोडवीलें : डावो परतला भणौनि : दूर्योधनें फांसे टाकीले : ते शकूनीया लपवीले : मग साही जनें वनवासा नीगाली : सूभद्रा-अभीमन्या वीदूराचा घरी ठेवीली : तंवं श्रीकृष्ण-चक्रवर्त्ति तेथ आले : यूधीष्ठीरातें संबोखीलें : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें :







‘तूमतें वारीलें होतें की जे तूम्ही जू न खेळावें : कौरवासि वीस्वासावें ना’: मग साहीजनें दंडवते करूणि वनवासा गेली : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति कूंतीयेसहीत द्वारकेसि बीजें केलें :” ॥ ८१ ॥

दूर्योधन-तातिक्करणी पांडवरक्षण-कथन :॥ ॥

एकु दी : महदाइसी पुसिलें : “जी जी : पांडव वनवासा गेलेंया दूर्योधनें काइ केलें ? ’: सर्वज्ञें म्हणितलें : “बाइ : पांडव वनवासा गेलेंयानंतरें दूर्योधनें आपूलीया पूत्रालागी बळिभद्राची कन्या मागीतली : तीतें परणावया दूर्योधन द्वारकेसि सपरीवारी नीगाला : ते सूभद्रा आइकीलें : मग क्रोधेंकरूणि वीदूराचा रथ मागौणि अभीमन्येसी द्वारकेसि नीगाली : आपण सारथी जाली : मार्गी चालता वाट चूकली : ते गीरीजापर्वतासि गेली : तेथ घटोत्कचें अभीमन्येसी अनवोळखी माहा यूध्य जालें : तेथ हीडंबा आली : तीया सूभद्रेतें वोळखीलें : परस्परें क्षेमाळींगणें जाली : मग सूभद्रा वृत्तांत सांघीतला : मग घटोत्कच राक्षेसाचें दळ मेळऊनि द्वारकेसि आला : तेणें आधीचि कपट करूणि वत्सळा हरीली : ते जानौनि समस्त कौरव तयावरि चालीले : ते घटोत्कचें भंगीले : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति अभीमन्या– वत्सळे शेषपाटु भरीला :।:

महदाइसी पुसिलें : “जी जी : पांडवी वनवासी काइ केलें ?” : सर्वज्ञें म्हणितलें : “बाइ : यूधीष्ठीरासी सहस्त्रभोजनावाचौंणि अन्न घेणें नाही : भणौनि श्रीकृष्णचक्रवर्त्ति सूर्याकरवी द्रौपदीसि थाली देववीली : मा यूधीष्ठीराचें सहस्त्रभोजन चालो लागलें : ते आइकौंणि दूर्योधनें तयातें छळावया दूर्वासा पाठवीला : तेनें आकाळी भोजन मागीतीलें : मग द्रौपदीया श्रीकृष्णचक्रवर्त्तिचें चींतन केलें : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति दूर्वासियासी ऋषीसहीत भोजन देऊनि तयाचा दर्प हरीला : असें आइकौणि दूर्योधनें जयद्रथ पाठवीला : तेणें द्रौपदी चोरूणि हरीली : घेऊनि नीगाला : तो श्रीकृष्णचक्रवर्त्ति भूलवीला : तो इकडौणि-तीकडौणि फीरौणि गुंफेचिपासी ये : तंवं पांडव आले : मग अर्जूनें त्यातें वीटंबणि सोडीलें : मग एकु दी दूर्योधन कर्णाचेनि मंत्रें पांडवावरि घाला घालावया अेत होता : तंवं तो येता गंद्धर्वी धरीला : मग शकूनीयें यूधीष्ठीराजवळि सांघीतलें : ‘जी : दूर्योधन तूमतें गावा नेयावया अेत होता : तो गंद्धर्वी धरीला’ : मग यूधीष्ठीरें अर्जूनाची वास पाहीली : अर्जूनें बाण गंद्धर्वाजवळि धाडीला : ‘आम्हासी यूध्यालागी यावें का दूर्योधन सोडावा’ : मग तेही भयेंकरूणि सोडीला : तो आपूलीया नगरासि गेला : तदनंतरें व्यासाचेनि ज्ञ्यासनें अर्जून तीर्थयात्रेसि नीगाले : मग : इंद्रकीळ पर्वती तेनें तप केलें : इंद्र प्रत्यक्ष जाला :







अर्जूनी इंद्रातें भणितलें : 'भीस्मद्रोणाचा क्षय होअे अैसी शस्त्रें द्यावी' : इंद्रें भणितलें : 'ते मजजवळि नसेति : माहादेवाजवळि असे' : मग अर्जूनी माहादेव आराधीला : तंवं अर्जूनदेवातें वधावया मुकु दैत्य चालीला : तो माहादेवें कीराताचेनि रूपें अर्जूना— सहीत वधीला : तेथ माहादेवा अर्जूनासि यूध्य जालें : अर्जूनी माहादेव पराभवीला : मग माहादेवें नीजरूप प्रकटौणि अर्जूनासि भणितलें : 'माग माग प्रसन्न जालो' : अर्जूनदेवी भणितलें : 'भीस्मद्रोण वधेति अैसी शस्त्रें दयावी' : मग माहादेवें अर्जूनासी अंबापत पशूपत ये दोनि शस्त्रें दीधली :

मग अर्जून अद्वैतवना यूधीष्ठाराजवळि आले : अैसें पांडवासी वनवासी असता : हीडंबू कुर्मीर राक्षेसाचेया पोटासि गेला : हीडंबू ऊदरांतूनि बोलीला : 'महेस्वरासी पांडवाची बळी देयाल : तरि मी ऊपजैन :' मग कुर्मीर राक्षेस ब्राह्मणाचा वेष धरूणि यूधीष्ठीराचीया दर्शना आला : भीमसेन वनफळालागी गेला असे : मग कूर्मीरें चौघाजनातें चाळऊनि नेलें : तंवं तेथ भीमसेन आला : द्रौपदियेसि पुसिलें : 'राजे के गेले ?' : द्रौपदीया भणितलें : 'अेकु ब्राह्मण आला : तयाचा सांघातें नदीसि गेले :' भीमसेनें नदीसि पाहीलें : तंवं तेथ न देखेति : मग अवघें वन शोधीलें : पर्वत शोधीला : तेथही न देखेचि ! : अैसी तीन दीवस सूद्धी न लभेचि ! : मग द्रौपदीयेतें ऋषीचा सांभळी करौणि पांडवातें पाहा [ वेया* ] चालीला : तो हीडंबचीया वनासि आला : हीडंबा सांघीतलें : 'राये कर्मीरें बळी देयावेया नेले अैसें आइकत असो : तूम्ही अेथ के आलेति ?' : मग घटोत्कच आन भीमसेन कर्मीरा राक्षेसांचिया नगरासि आले : घटोत्कच नगराबाहीरि ठेवीला : भीमसेन नगरात माहेस्वरीचीया देऊळासि गेला : ते देवतां भूमीमाजी घालूणि आपण देवतेचा वेष घेऊनि तेथ बैसला : पांडव आनीले भणौनि हीडंबू ऊपजला : मग कर्मीरें देवतेची पूजा केली : तूपामधाचीया घागरी रीचवीलिया : तीया भीमसेनें प्रासीलीया : जंवं ग्रासी तंवं ते घालीति : अैसी अेथोचीत पूजा केली : कर्मीरें बळी द्यावेया चौघें पांडव आनीलें : मा कर्मीरें यूधीष्ठीरावरि आपूली कूळदेवता— स्मरण भणौनि हानावया खर्ग ऊचलीलें : तंवं कर्मीर भीमसेनें पायरा हानीतला : मग दोहीसी तूंबळ यूध्य जालें : कर्मीर वधवेना : मग तेथ श्रीकृष्णचक्रवर्त्ति बीजें केलें : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति आन भीमसेनें दोघी मीळौणि तो मारीला : मग भीमसेनें हीडंब वधीला : अेर राक्षेस ऊठावले : ते घटोत्कचें मारीले : ते राज्य घटोत्कचासि देऊनि पांडव आपूलीया स्थाना गेले : अैसी वनवासी पांडव बहूतें चरीत्रें केली : अैसी बारा वर्षें भरली :

मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति पांडवातें वैराठा पाठवीलें : मार्गी वैवस्वत भेटला : तेणें द्रौपदियेसहीत पाचाची रूपें पालटीली : नावें पालटीली : मग पांडवं नष्टचर्यालागी वैराठासि गेले : तेथ तयाची ऊल्लींगें अंगीकरूणि असो लागले : तंवं तेथ द्रौपदीयेचा कींचकें अभीळास मांडीला : तो भीमसेनें रात्री वधीला : ऊदीयाचि तयाचे शतभरि बंधु कींचक द्रौपदीयेतें अग्णीमाजी घालू लागले : मग भीमसेनें आपूलें रूप पालटुणि अवघे कींचक वधीले : ते आइकौणि दूर्योधनें पांडवाचीये शूद्धीलागी वैराठासि हेर पाठवीले : तयातें भणितलें : ' आकाळी वृक्षवल्लीसि फूलेंफळें जेथ असती आकाळी धेनू वळती : तेथ पांडव असेति अैसें जाणावें ' : मग हेर वैराठासि गेले : खुणा पूरलीया : परि पांडव चोजवतीचिना : तेंही जाऊनि दूर्योधनाजवळि जाऊनि अवघी व्यवस्था सांघीतली : मग दूर्योधन पांडवातें चोजवावेया वैराठा जींमूतीमाल पाठवीला : तो पांडवाची रूपडी तोरडी घालूणि वैराटाचीये सभेसि गेला : मालें वैराटासि भणितलें : ' तूझा नगरी कव्हणी नाही दादूला पां मजसी भीडे ? ' : मग वैराठें भणितलें : ' आरे बालवा भानवसी बोलावा : तो भला असे : तो यासी भीडैल ' : मग भीमसेनु आला : हाती मूसळ कढवा चाटु हाती हातकडे अैसा आला : वैराटें भीमसेनासि भणितलें : ' बालवा भानवसीहो आमतें अेणें जीमूत-वाहानें नोकीलें असे : कींचक असता तरि याची आइन पूरवीता : आता तूम्ही यासी भीडावें ' : तेव्हळि दोघासि पैंज जाली : मग दोघासि सर्व-फळें जालें : भीमसेनें जीमूतवाहान वधीला : ते दूर्योधनें आइकौणि वैराठ देशावरि चालि केली : तंवं मोटकेंचि नष्टचर्याचें वर्ष लोटलें असे : मग तेणें वैराठाचीया गाइ द्वीधां सैन्ये करूणि वळीलीया : अेकें गोधनें भीमसेनें सोडवीली : अेकें गोधनें अर्जूनी सोडवीली : मग अर्जूनी दूर्योधनादीक मोहनी घालूणि वीवस्त्र केलें : मग कौरव आपूलीया नगरासि गेले : मग पांडव प्रकट जालें : वैराठ पांडवाचीया पाया लागला : ' हें अवघें राज्य तूम्ही करा : मी तूमचा खीरारी होऊनि वर्त्तैन ' : परि यूधीष्ठीरु नेघेचि : वैराठें आपूली कन्या ऊत्तरा अभीमन्यासि दीधली : मग : श्रीकृष्णचक्रवर्त्ति तेथ येऊनि यूधीष्ठीर सींहासनी बैसवीला : मग पांडव मीयूळेसि गेले " : ॥८२॥

श्रीकृष्ण सीघ्राइगमणी दूर्योधनताडन — कथन : ॥ ॥

एकु दी : महदाइसी [पुसिलें*] : " हा जी : कौरवा-पांडवा इतूकें वोखटें : तरि श्रीकृष्णचक्रवर्त्ति तयातें म्हणतीचि ना : सीकवतीचिना : ते काइ जी ? ' : सर्वज्ञें म्हणितलें : " बाइ : पांडव वनवासीहूनि





आलेंयानंतरें : तबाचीये सौष्ठाइलागी श्रीकृष्णचक्रवर्त्ति हस्तिनापूरासि बीजें केलें : दूर्योधनाते भणितलें : 'आगा राया दूर्योधना : तूम्ही आन पांडव बंद्ध : तूम्हासि वीरूद्ध काइसा ? : तूम्हासि आन पांडवासी सौष्टाइ करू : त्या पांडवासी तूम्ही पांच गव्हानें राहावेयासि द्यावी' : तेणें भणितलें : 'हो का जी : तूम्ही म्हणत असा तरि मी देइन' : मग लाहानें अैसी पाच गव्हानें बोलीला : श्रीकृष्णचक्रवर्त्ति येऊनि यूधीष्ठीराजवळि सांघीतलें : यूधीष्ठीरें भणितलें : 'आम्ही पाच नगरें देशासहीत घेऊनि : ते जरि नेदी तरि यूध्य करूणि' : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति दूर्योधनाजवळि जाऊनि भणितलें : "दूर्योधना यूधीष्ठीर लाहानें गव्हाने नेघे : तो अैसें म्हणताये : । : 'इंद्रप्रस्थ :। १ ।: यमप्रस्त :। २ ।: जयंती :। ३ ।: वारुणावत :। ४ :। देहीमेदेशसंयूक्तं : पंचमं हस्तिनापूरं ।५।" तंवं दूर्योधनें भणितलें :

'सूचीकाग्रेनतीक्ष्णें नयोसाभेदीत मेदीनी :।
तमहं न प्रदाश्यामी वीनायूद्धचेन केशव' :। १ ।:

— अैसें दूर्योधनें भणितलें : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'दूर्योधना अैसें नको करू : हस्तीनापूर नेदीचि तरि इंद्रप्रस्थसहीत अर्द्धराज्य देचि : मा तयासी मानवीन : अेथीचें भणितलें न करीसी तरि पाहाताचि अेकला अर्जून तूम्हा अवघेयासि बाणवेन्ही फोडील : हनूमंत भूभूकारु देइल : देवदंत्त शंख स्फूरैल : भीमसेनाचेनि गदाघातें अवघें कौर[व*]रणा अेतील : तेधवा आपसैयाचि राज्य देसील : आनि काइ' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति मीथूळेसि बीजें केलें : अैसें श्रीकृष्णचक्रवर्त्ति त्रीशूद्धी हस्तीनापूरासि बीजें केलें : परि दूर्योधन सौष्टाइ न मनीचि ! : मग चौथीये वेळे श्रीकृष्णचक्रवर्त्ति सौष्टाइसी बीजें केलें : करू आदरीलें : ते दूर्योधनें आइकीलें : जे श्रीकृष्णचक्रवर्त्ति सौष्टाइसी अेताति : म्हणौनि धरूणि वधावेयाचा वीचारु केला : श्रीकृष्णचक्रवर्त्ति तेथ अेऊनि पाहीलें : वीदूराचीया ठायासि बीजें केलें : परि तेव्हेळी बहूत आदर केला : मग दूर्योधनें ऊपहास केला : 'हा हो तूम्ही आपणयातें कळीराजे म्हणवीता : आन वासीपूत्राचेया आवारासि गेलेति ? : मा तेणें तूम्हासि काइ पाहून्नर केला ?' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें :

'भोजनं गतजीर्णंच आदरं कीं न पृछसी :
भोजनं गतजीर्णंच आदरं स्त्वजरांमरं' :।१।:

— इतूकेनि श्रीकृष्णचक्रवर्त्ति नीगो बैसले : तेव्हळि दूर्योधनें भणितलें : 'धरारे धरा यातें : केऊता जाईल ? : इतूकें हाचि करीत असे' : म्हणौनि

कौरव श्रीकृष्णचक्रवर्त्तितें धरू नीगाले : तंवं श्रीकृष्णचक्रवर्त्ति वीज्ञान प्रकटीलें : आपण अदृश्य होऊनि तथौनि बीजें केलें : कौरवं परस्परें श्रीकृष्णचक्रवर्त्ति-सारीखेंया देखेति : मग तेंचि अेकमेकातें बांधो लागले : अेकमेकातें गूढगेवेन्हीं पापरा मारीति : श्रीकृष्ण भणौनि दूर्योधनातें अवघे मारीति : अैसा तेही अवघा दूर्योधनातें बांधीलें : तैसेचि श्रीकृष्णचक्रवर्त्ति भीस्मदेवाचीया राऊळासि बीजें केलें : भीस्मदेवातें पूसौणि नीगाले : सरीसे भीस्मदेव वीदूरदेव बोळवीत नीगाले : तंवं मार्गी कर्ण भेटला : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ' कर्णा आपूलीया बंद्धूसी सीकवीसि ना ? ' : तेणें भणितलें : ' काइ करू जी : जोंधळेयाची पायीकें येरा रायाचीया राणीया खूट व्यालीया ' : मग ते तीघे परतलें : तंवं दूर्योधनाचा घरी हाहाकारु होत असे : ते आइकौणि तीघें तेथ गेले : तंवं ते अेकमेकातें बांधताति : हानताति : मग भीस्मेंवीदूरें भणितलें : ' आरे हे काइ करीता ' : ' ना आम्ही कृष्णातें मारीतो बांधीतो ' : भीस्मेंवीदूरें भणितलें : ' त्यासि आम्ही बोळऊनि आलो : तो तूम्ही काइ धराल पापीये हो ' : मग वीज्ञान पारुखलें : सर्वेचि श्रीकृष्णचक्रवर्त्ति तेथ बीजें केलें : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ' दूर्योधना तूम्ही काइ करीत होतेति ? ' : इतूकेनि तेणें खालूती मान घातली : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति मीथूळेसि बीजें केलें : ' ॥ ८३ ॥

कर्णमनोगतग्रहण-कथन :॥ ॥

सर्वज्ञें म्हणितलें : " बाइ : श्रीकृष्णचक्रवर्त्ति मीथूळेसि बीजें केलें : मग पांडव साऊमे आले : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ' कौरव सीष्टाइ न मनीतीचि ! ' : पांडवी भणितलें : ' जी जी : आता कवणि परि करावी ? ' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ' तूम्हा पाचासी कर्णाचेनि हातें मृत्यू असे ' : ' जी जी : तरि कर्णासी आभू जावो ' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ' जाइजे ' : मग पांचै पांडव : कूंतीदेवी : श्रीकृष्णचक्रवर्त्ति : कर्णाचीया नगरासि गेले : श्रीकृष्णचक्रवर्त्ति पूढा जाऊनि भणितलें : ' कर्णा तूमची माता आली असे ' : कर्णें भणितलें : ' जी जी : मी मातापीता नेने : मीया आपूली माता कैसेनि जानीजे ? ' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ' तूम्हासि जे परीक्षा असैल तीये परीक्षा जानीजे ' : कर्णें भणितलें : ' जी जी : कव्हणी अेकी काळी कौरवी अग्णीमूखी आहूत देवो आदरीली : तयासि हात नीगेति : मज अग्णीमूखी आहूत देता हात न नीगेति : भणौनि मीया अग्णीप्रवेश करू आदरीला : तंवं तेथ ब्राह्मणाचेनि वेषें सूर्यो आला : तेणें भणितलें : ' आगा ये हे काइ करीतासि ? ' : मीया भणितलें : ' तू कवण ? ' : तेणें भणितलें : ' मी तूझा पीता सूर्यो ' :

मीया भणितलें : 'हो का : तू माझा पीता होसी तरि माझी माता कवणि ? ' : सूर्यो भणितलें : 'पाचाग्णीचा फूटा नेसैल ते तूझी माता : अैसें तूवा जाणावें' : मग मज सूर्यो पाचाग्णीचा फूटा दीधला : पाच माहेश्वरी बाण दीधले : मग तो अदृश्य जाला : तरि हे पंचाग्णीचीर नेसैल तेचि माझी माता : आनि काइ" : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति कूंतीयेदेवीतें पाचारूणि नेलें : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'हे घेया कर्णा तूमची माता' : कर्णे तीयेसि नमस्कारु केला : तेव्हळि कर्णे बाणीहूणि पाचाग्णीचा फूटा काढीला : तो कूंतीदेवी नेसली : मग दोघा क्षेमाळींगण जालें : तंव पांडव आले : परस्परें बंधूवर्ग भेटले : कर्णे बरवा आदरु केला : अैसे दीवस सात भरले : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'कर्णा तूमतें न्यावेया तूमचे बंधू आले असति : तूम्ही चालाना' : तंवं कर्णे भणितलें : 'ना जी : मी न ये' : तेव्हेळी कूंतीयेसहीत पांडव नीगाले : मागें श्रीकृष्ण-चक्रवर्त्ति कर्णातें भणितलें : 'कर्णा आता कौरवा-पांडवा यूध्य मांडैल : तेव्हळि तूम्ही कवणाकडे होआल ?:' कर्णे भणितलें : 'जी जी : सर्वज्ञ कवणीकडे ?' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'हे द्रौपदीयेकडे होइल' : कर्णे भणितलें : 'जी : सर्वज्ञ द्रौपदी सा ठाइ करीतील तरि मी पांडवाकडे असैन' : अैसा ऊपहास केला : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'अेथीचें भणितलें न करा तरि अर्जूनाचेनि हातें रणी पडाल' : कर्णे भणितलें : 'जी जी : हे साचचि : परि दूर्योधने माझे अेकेक लळे पाळीले असे : ते काइ सांघावे : कव्हणी अेकी वेळी भानामतीसी जू खेळीत होता : तंवं भानामती गळाचा हार वोडवीला : तो मीया जींकीला : मग मीया हारासि हात घातला : तंवं भानामतीया गळा प(व)ळवीला : मग : तीयेचा वक्षस्थळी नखें वाहीली : हात सूटला : इतूकेनि मूक्ताफळें वीखूरली : ती दोघें वेची तो भानामती रूदन करीत असे : तंवं दूर्योधनु आला : तेनें मज मूक्ताफळें वेचीता देखीले : आन माझे हात वरीचीयावरि धरीले : मग भणितलें : 'हे काइ भानामती ये कर्णाचे हात सीनती की' : अैसा तो कीमीपही वीकरेचि ना जी : अैसे तेणें माझे लळे पाळीले : तरि मी त्यासी काइसेनि ऊत्तराइ होइन ? : हे देह त्याचा काजी दीधलें असे जी : मी न ये : श्रीकृष्णचक्रवर्त्तिचें भणितलें न करीचि' : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति पांडवाजवळि बीजें केलें : मग कूंतीयेतें भणितलें : 'तूम्ही जाऊनि कर्णासि आनावें : जरि न ये तरि तया-जवळि माहेस्वरी पाच बाण सूर्ये दीधले असे ते मागावे : नाही तरि तेही बाणी पाचाही पांडवा मृत्यू असे' : इतूकेनि कोंती कर्णाचीया नगरासि गेली : कर्णे बरवा आदर केला : कूंतीया भणितलें : 'बा कर्णा चाल' : कर्णे भणितलें : 'मी न ये' : तेव्हेळी कूंतीया भणितलें : 'बा न येसि तरि मी मागैन ते मज

देशी ? ' : कर्णें भणितलें : हो आइ : देइन ' : तेव्हेळी कूंती तीया माहेस्वरी पाचै बाण मागीतीले : तेणें दीधलें : मग कूंती पांडवाजवळि आली : ते बाण श्रीकृष्णचक्रवर्तिजवळि दीधले : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति ते बाण आपूलेनि श्रीकरें जाळीले : " ॥ ८४ ॥

दूर्योधना वीस्वासघाती श्रीकृष्ण-क्षेमा-कथन :॥ ॥

यंत्रासनाऊपरि : भटी भणितलें : " बापु बापु मानवे तया : श्रीकृष्ण-चक्रवर्त्तिसि कैसी असाहानी धूर ? " : सर्वज्ञें म्हणितलें : " वानरेया : दूर्योधनें केव्हढे केलें : मा मां श्रीकृष्णचक्रवर्त्ति काइ वीकरले ? " : भटी भणितलें : " जी जी : ते कैसे न वीकरतीचि ? " : सर्वज्ञें म्हणितलें : " वानरेया : पांडवा कव्हणा आंतूडेति ना : मग दूर्योधनें वीचारु केला : ' हे रामकृष्ण वधू : मग हे पांडव आपसैयाचि आतूडती ' : भणौनि सा मास सूचना केली : मग मूळ पाठवीलें : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति यादवासहीत हस्तीनापूरा बीजें केलें : तैसेंचि श्रीकृष्णचक्रवर्त्ति भानामतीयेचीया राऊळासि बीजें केलें : भाणामती ते बळिभद्रांची बहीण : भाणामतीसि श्रीकृष्णचक्रवर्त्ति भेटेतिना : ते म्हणे : ' हे काइ दादो सा मास वाट पाहाता डोळे कूहीले : तूजकारणें आइती करीत असे : आन तू अैसा नीष्ठूर ! ' : भणौनि दूःख करू लागली : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति तीयेसी पोटीसी धरीलें : संबोखीलें : मग तीया भणितलें : ' दादो द्रौपदीचीया ठाया वेळोवेळा जासी : आन आमचेया ठाया न येसी ! : तूज पांडव काइ होति आन कौरव काइ नव्हेति ? ' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ' पांडव ते माझे भक्त : आन कौरव सदाचे कपटीआ वो : बाइ : तू आपूलीया वरंतासि सीकवीसि ना ' : तीया भणितलें : ' दादो तू पांडवाचेया अैसेंचि बोलतासि : आमसि कपट करीतासि ' : श्रीकृ णचक्रवर्त्ति भणितलें : ' कपट ते तूमचाचि ठाइ ' : तीया भणितलें : ' कैसें कपट दादो : पाहे पा तूजलागी कैसे आदर केले असति ' : श्रीकृष्ण-चक्रवर्त्ति भणितलें : ' आता अेथौणि तूमचें कपटपण दाखवीजैल : आन अेथ आदर केले असति तेही दाखऊ चाला तूम्हासि ' : तैसेंचि श्रीकृष्णचक्रवर्त्ति दूर्योधनाचिया राऊळासि बीजें केलें : तंव दूर्योधे(ध)नें शस्त्राचें यंत्रासन केलें : ते पेवामाजी घातलें : वरि मंचकु पासवडीला असे : दूर्योधनें श्रीकृष्णचक्रवर्त्तिसि तया मंचकावरि बैसकारु देवो आदरीला : तंव श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ' तूम्हा कपटाचा ठाइ काइसा आदर ? ' : तंव दूर्योधनें भणितलें : ' जी : अैसें कैसें कपट ? ' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ' तूम्ही जरि कपटी नव्हा तरि हे अैसें तूम्हा करू येताये ' : भणौनि श्रीचरणाचेनि आंगोठेनि पासवडा

आसडूणि परता केला : तंवं धगधगीत शस्त्रें देखीली : जैसीया काळीया सर्पाचीया जीव्हा अैसें देखीलें : भानामती भीयाली : ' दादो हे काइ तूजलागी ? ' : ' ना हो आम्हालागी : बाइ : हे कपट की : आता तूम्ही कपटीअे ' : तीया भणितलें : बा हे कपटीअे पापीये : हे मी नेने की : आता या पापीयासी वीस्वासो नको रे बा : याचीया बूद्धी अैसेंयाचा नीवँश होइल ' : तैसेंचि श्रीकृष्णचक्रवर्त्ति बीजें केलें : अैसे गा श्रीकृष्णचक्रवर्त्ति अवीक्रीये " :॥ ८५ ॥

कौरवा साहायदान-कथन :॥ ॥

सर्वज्ञें म्हणितलें : " बाइ : श्रीकृष्णचक्रवर्त्ति पांडवासहीत आपूलेनि परीवारेंसी श्यमंतपंचकासि बीजें केलें : पांडवी आपूलीया साह्यालागी पृथवीचे राजे मेळवीले : ते आइकौणि दूर्योधन आपूलेनि परीवारेंसी श्यमंतपंचकासि आला : मग : अकी दीवसी पाहाताचि दूर्योधन श्रीकृष्णचक्रवर्त्तितें सहाये मागावया अेकलाचि अेकें सेवकें आला : तंवं श्रीकृष्णचक्रवर्त्ति माचेंयावरि पहूड स्वीकरीला होता : नीद्रा लागली होती : रायासी खाली बैसो नये : मणौनि श्रीमुकुटांकडे माचेयावरि बैसला : ते आइकौणि मागीलाकडौणि अर्जूनही साहाये मागो आले : तंवं श्रीकृष्णचक्रवर्त्ति ऊपहूड स्वीकरीला : श्रीमूखावरील फूटा परता करूणि अर्जूनाची वास पाहीली : ते पहीली दृष्ट अर्जूनावरि पडीली : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ' अर्जूनहो : केधवा आलेति ? ' : अर्जूनदेवी भणितलें : ' आताचि आलो ' : अर्जूनी भणितलें : ' जी जी : राऊळाची सेवा करू लाभे की ' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति काही बोलती भणौनि अर्जूनी सांघीतलें : ' जी जी : राजे आले असति ' : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति वरीला दृष्टी दूर्योधनाची वास पाहीली : आन भणितलें : ' राजे हो : केधवा आलेति ? ' : ' जी जी : आताचि आला ' : तेव्हळि दूर्योधनें हात जोडीले : मग भणितलें : " जी जी : आम्हासी राऊळें साहाये देयावें : मी साहाये मागो आला असे ' : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति क्षेण अेकू नीश्चळ होऊनि भणितलें : ' अेकी अक्षौहीणी सैन्य : आन कृतवर्मा दळवै : बळभद्र मूख्य करूणि इतूकें दळ अेकीकडे : आन हे अेकलेंचि नी:शस्त्री अेकीकडे : परि सेल वाटा अर्जूनासि हो ' : दूर्योधनें भणितलें : ' जी जी : मी आधी आला : तरि सेलि माझी की ' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ' तूम्ही आलेति ते तैसेंचि : परि आधी दृष्टि यावरि पडीली की : भेटि आधी यासी जाली की ' : तंवं दूर्योधनाचा ती(ची)ती अैसें जालें : ' इतूकें अवघें हा घेऊनि जाइल : मा अेकले श्रीकृष्ण मजकडे येऊनि काइ करीती ' : अैसें जंवं मनी भावीलें तंवं अर्जूनी भणितलें : ' जी जी : सर्वज्ञचि आम्हाकडे बीजें करावें जी ' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति मानीलें : अर्जूनी हर्षातें पावौणि भणितलें : ' जी जी : सेल ते

माझीचि आली : मज सर्वज्ञ अकलेचि पूरेति ’ : मग दूर्योधनें बाहे आफळीली : मग : अेक अक्षौहीनी नारायेणी सैन्य : कृतवर्मा दळवै : बळभद्र : अैसें सैन्य घेऊनि गेला " : ॥ ८६ ॥

रणस्तंबप्रतीष्ठाकरणी वीपरीत तीथिकरणी- कथन :॥ ॥

सर्वज्ञें म्हणितलें : “ बाइ : दूर्योधन यमूनेचा तीरी सपरीवारी बैसला होता : तेथ श्रीकृष्णचक्रवर्त्ति मायीक पौराणीक करूणि धाडीला : तो दूर्योधनाजवळि पूराण सांघो लागला : तवं तेथ बळिभद्र आले : तयातें देखौणि दूर्योधनमूख्य अवघे कौरव ऊठीले : तो पूराणीक नूठीचि ! : भणौनि बळिभद्रीं मूसळें हानौनि मारीला : तवं हाहाकारु जाला : ब्रह्महत्या घडली भणौनि बळिभद्री ब्राह्मणासि प्रायश्चीत पुसिलें ब्राह्मणी भणितलें : तीही लोकीची तीर्थे केलेंया प्रायश्चीत होइल : मग बळिभद्री अठरा दीवसाची गडे करूणि तीर्थयात्रेसि नीगाले : तीर्थयात्र(त्रा) करीता बल्वल वधीला : मग : जीये दीवसी दूर्योधन वधीला तीये दीवसी बळभद्र आले : बळभद्र तीर्थयात्रे गेलेंयानंतरें श्रीकृष्णचक्रवर्त्ति सहादेवातें भणितलें : ‘ रणखांब कै स्थावरावा ? ’ : साहादेवें भणितलें : ‘ भाद्रपदीये आमावश्येसि स्थावरावा : आधी स्थावर जीती तें जींकती ’ : तवं दूर्योधनें आमावश्येचा दीवसी खांब स्थावरु आदरीला अैसें श्रीकृष्णचक्रवर्त्ति आइकीलें : मग तेरसीची आमावश्या केली : अैसी वीपरीत तीथ करूणि अर्जूनातें बोलावीलें : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ‘ अर्जूनहो साहादेवहो चाला : खांब आनू : मग गेले : आनीला : मग कूरूक्षेत्री सात पर्वे तो खांब स्थावरीला : तेथीचें वीधान केलें : मग स्त्रीगंजन पुरुष आनौणि तेथ गडे प्रमाण रोवीला : आपण गेले : तवं रात्री तया खांबापासी दो पीलीयासहीत लाहासी आली : तीये पीलीया तया पुरुषासि खावो धावीन्नली : तवं तीया लाहासी भणितलें : ‘ आरे बा : ऊदया अेथ कौरवा–पांडवा संग्राम होइल : मग अेथ कौरे रणी पडती : तयातें तूम्ही सेलामेदां खावें ’ : तवं तेही पीली भणितलें : ‘ हा आइ कवण हारवती : कवण जींकती ? ’ : लाहासी भणितलें : ‘ कौरव हारवती : पांडव जींकती ’ : अैसें बोलौणि गेली : ऊदीयाचि श्रीकृष्णचक्रवर्त्ति तेथ जाऊनि तो स्त्रीगंजन काढीला : तयातें पुसिलें : ‘ कवण हारवती : कवण जींकती ? ’ : तेणें भणितलें : ‘ कौरव हारवती : पांडव जींकती ’ : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति आपूलीया बीढारासि बीजें केलें :

तवं पाताळी पद्मावतीया कौरवापांडवाचीया यूध्याचा आरंभु आइकीला : मग बभ्रूतें भणितलें : ‘ बा तूझीया पूर्वजासी जुंझ मांडलें : तरि साहाया

जासिना': मग तेणें तीण कांडें घेतली : त्या भणितलें : 'बा कवणीकडे होसी ? ': मग तेणें भणितलें : 'आइ : हारवती त्याकडे होइन ' : मग तैसाचि नीगाला : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति ब्रांह्मणाचें रूप धरूणि साऊमें बीजें केलें : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'तुम्ही कवण ? : कवणीये ठाऊनि येता ? ' : तेणें भणितलें : 'मी बभ्रु : भीमसेनाचा पुत्र : पाताळीहूनि येताये ' : 'कोठें जाता ? ' : 'ना कौरवापांडवा यूध्य होताये : त्या साहाया जाताये ' : श्रीकृष्ण-चक्रवर्त्ति भणितलें : 'तुम्ही कवणीकडे होआल ? ' : तेणें भणितलें : 'मी अडलेंया दळाचा सारथी होइन :' श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'हा बभ्रु तू असना वीर : आन तुजजवळि तीनीचि कांडें का ? : तेणें भणितलें : 'जी : तीही कांडी तीन्ही लोक जींतैण : चौथें कांड कवणालागी वाहो ? ' : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति तयाचा हाती सेंदूराचा नळा देऊनि भणितलें : 'वींधीया मृत्य लोक : पाहोया प्रतीति ' : मग तेणें तो सेंदूराचा नळा वींधीला : मा जयाचें जेथ मरण तेथ तो सेंद लागला : श्रीकृष्णचक्रवर्त्तिचा तळवा सेंदूराचा सुबा ऊमटला : ते देखौणि श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'हे सत्य करीलचि ' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'माग माग प्रसन्न जाला ' : तेणें भणितलें : 'आम्हा क्षेत्रीयासि हात जोडु न ये : तुम्हीचि मागा ' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'दे भाख ' : 'दीधली ' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'आपूलें शीर अेथ दे ' : तेणें भणितलें : 'जी जी : देइन : परि जे होऊनि आलो ते देखावेंकी ' : श्रीकृष्ण-चक्रवर्त्ति भणितलें : 'तू देखसी ' : मग दंडवत करूणि आपूलें शीर छेदू बैसला : तंवं शीर न छेदे : मग तेणें भणितलें : 'जी जी : माझें मरण माझेया पीतेयाचेनि हातें असे : तयाकडौणि तुम्हा शीर देवबीन ' : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति बभ्रुसहीत बीढारा बीजें केलें : पाहातेचि भीमसेनातें भणितलें : 'तुम्ही रणखांबापासी बैसा : तेथ कव्हणी सांडनी घेऊनि येइल : त्यातें वधावें ' : भीमसेनु तेथ जाऊनि बैसला : श्रीकृष्णचक्रवर्त्ति बभ्रुतें भणितलें : 'तूवा हे बळी देऊनि रणखांबापासी ठेवावी ' : मागुता पाऊला तेथ गेला : तो भीमसेनें अेता देखौणि वधीला : पाहे तंवं तो ओळखीला : मग दू:ख करू लागला : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति तेथ अेऊनि भीमसेनातें संबोखीलें : तंवं बभ्रुसी प्राण होता : तेणें भणितलें : 'जी जी : मी हे यूध्य न देखेचि जी ' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : जंवं यूध्य होये तंवं तूझा प्राण न वचे ' : मग तो श्रीकृष्णचक्रवर्त्ति रणखांबाजवळि आवळेयाचेया झाडावरि बैसवीला : तेणें यूध्य पाहीलें : महदाइसी भणितलें : 'जी जी : तयासि काइ जाले ? ' : सर्वज्ञें म्हणितलें : 'बाइ : बभ्रुसी श्रीकृष्णचक्रवर्त्तिपासूनि देहांतरी प्रेमदान वर्त्तैल " : ॥ ८७ ॥

सैन्यभेद - कथन :॥ ॥

एकु दी : महदाइसी पुसिलें : “ नारायेणी सैन्य कृतवर्मा दळवै : श्रीकृष्णचक्रवर्त्ति कौरवासि दीधले : त्याचा प्रतापु काही नाही जी ? : ना काइ जालें असें आइकीजेणा ” : सर्वज्ञें म्हणितलें : “ बाइ : बळभद्र तीर्थयात्रे गेलेंयानंतरें भीस्मदेवासि दाहा दीवस दीधले : द्रोणाचार्यासि पाच दीवस दीधले : कर्णासि दोनि दीवस दीधलें : शाल्वासि अेक दीवस दीधला : असी दूर्योधनें अठरा दीवसाची व्यवस्था केली : मग आश्वीन शूद्ध प्रतीपदेसि भीस्मासि रणवट बांधला : तेव्हळि दोन्ही दळें ऊन्नत्त जाली : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति कृतवर्मयातें बोलावीलें : तो आला : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ‘ हाहो कृतवर्मेहो : तूमचेया सैन्यांत कापूस कीतूकेया वोपे ? ’ : तेणें भणितलें : ‘ हे काइ जी ’ : भणौनि खदखदकरि हासीला : कृतवर्मेनि भणितलें : ‘ जी जी : काइ आज्ञा असे ? ’ : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ‘ हेचि आज्ञा ’ : आन मूखेंसी वोली लाऊनि हासतेंचि गेला : तो दूर्योधनें पाचारीला : मग भणितलें : ‘ कृतवर्मेहो : तूमतें श्रीकृष्णें का पाचारीलें ? : काइ भणितलें ? ’ : कृतवर्मेनि भणितलें : “ काइ सांघो राया ’ : तेणें भणितलें : ‘ आपुलेंया पूर्वजाची आन तरि न सांघा ” : कृतवर्मेनि भणितलें : ‘ सर्वज्ञाचें काइ : अेथची रळी केली ’ : मज भणितलें : ‘ तूमचा सैन्यांत कापुस के वोपे ? : भणौनि मी हासीला ’ : दूर्योधनें भणितलें : ‘ पाहा हो हा आमसी झांसा : तूम्ही काइ आपूलीया स्वामीसि अंतर देयाल : तूम्ही काइ जूंझाल : तूम्ही जा ’ : कृतवर्मेनी भणितलें : ‘ आम्हासि जावेया आमचेंया सर्वज्ञाची आज्ञा नाही : आम्ही जुंझौणि ’ : दूर्योधनें भणितलें : ‘ तूम्ही झूंझा तरि तूमचेया स्वामीची आन ’ : इतूकेनि कृतवर्मा नारायेणी सैन्येसी श्रीकृष्णचक्रवर्त्तिजवळि आला : आन भणितलें : ‘ जी जी : दूर्योधनें आम्हासि आज्ञा दीधली ’ : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ‘ तरि तूम्ही द्वारकेसि जा ’ : भणौनि तयासी पाठवनी दीधली : मग : कृतवर्मा सर्व सैन्येसी द्वारकेसि गेला : मग : श्रीकृष्णचक्रवर्त्ति अर्जूनाचे सारथी जाले : ध्वजास्तंबी हनूमंत : मग अर्जूनी भीस्मासि बाणलीखीत लीहूनि पाठवीलें : ‘ तूम्ही उभयथा महपीते : तूम्ही जुंझो नको : जुंझाल तरि आम्हासि बोल न ठेवीजे ’ : ते लीखीत भीस्में वाचीलें : परि तयाचें मन न भंगेचि ! ” :॥ ८८ ॥

यूध्यसमयी अर्जूना ज्ञानदान- कथन :॥ ॥

एकु दी : सर्वज्ञ मूळसूत्रीचा पाचवा थोवा भटाप्रती नीरोपीत होते : तयाऊपरि सर्वज्ञ हे कथा सांघीतली : तथा तेव्हळि हे ऊपपत्ति दीधली : सर्वज्ञें

म्हणितलें : “ श्रीकृष्णचक्रवर्त्ति अर्जूनाप्रती भणितलें : ‘अर्जूनहो : मी सर्वज्ञ’ अर्जूनदेवी भणितलें : ‘हे काइसेंयातवं ?’ : अैसी चर्चा प्रवर्त्तली : श्रीकृष्ण-चक्रवर्त्ति परीहारु केले : अर्जूनी आशंका केलीया : अैसा आक्षेप– परीहारी गीता प्रवर्त्तलीया :।: श्रीकृष्णचक्रवर्त्ति नीरोपीता अर्जूना शंका काइसेनि न पारूखेची : तेव्हळि अपरोक्ष प्रकटीलें : मग शंका पारूखली :।१।: पूसतेंया अर्जूनाचा अभीप्राये तो अैसा जे : श्रीकृष्णचक्रवर्त्तिचें परावरत्वें सूचौणि बोलत असे :।१। पूसतेंया अर्जूनाचीया यूक्ती : श्रीकृष्णचक्रवर्त्तिसीचि परीहरेति :।१।: महदाइसी पुसिलें : ‘जी जी : हे गीता कवणें केली ?’: सर्वज्ञें म्हणितलें : ‘बाइ : गीता श्रीकृष्णोक्ति : अेर [अ*]वघी व्यासोक्ति’ :।१।: ‘जी जी : अेरि ते काइ ?’ : सर्वज्ञें भणितलें : ‘तो वाकबंद्ध’ :।: महदाइसी भणितलें : ‘जी’ : श्रीकृष्णचक्रर्वात्त भणितलें : ‘सर्व काही जे जे श्रेष्ठ ते मी’ : ‘तरि हे कैसें घडे जी ?’ सर्वज्ञें म्हणितलें : ‘बाइ :।: श्रीकृष्णचक्रर्वात्ति तीयेतीये शक्तीचा ठाइ अहंता स्वीकरूणि ते ते शक्ती आत्मत्वें नीरोपीते जाले :। १ । महदाइसी भणितलें : ‘जी जी : श्रीकृष्ण-चक्रवर्त्ति वीभूती कवणे अभीप्राये नीरोपीली ?’ : सर्वज्ञें म्हणितलें : ‘बाइ :।: श्रीकृष्णचक्रवर्त्ति सकळा शक्तीचा ठाइ आत्मत्व अवीकरूणि अर्जूनाप्रती वीभूती नीरोपीली’ :। १ ।: महदाइसी भणितलें : ‘जी जी : श्रीकृष्णचक्रर्वात्त अर्जूनासि ज्ञान केधवा दीधलें ?’ : सर्वज्ञें म्हणितलें : ‘दोही दळाचीया अरणी यूधाकारणें ऊन्नत जालीया : अेराची कांडें अेरावरि पडेति : अेराची कांडें अेरावरि पडेति : अेकमेकाची कांडें अेकमेकावरि पडेति : अैसा समयी ज्ञान दीधलें’ : महदाइसी भणितलें : ‘जी जी : ते कैसें ?’ : सर्वज्ञें म्हणितलें : “बाइ: अर्जून गोत्रजसोयीरे-धायीरेगुरु अैसे अवघे सहवासी देखौणि वीषादातें पावले : इतुकेनि अक्षेपी-परीहारी गीता प्रवर्त्तलीया : अर्जूनी भणितलें : ‘जी जी : मज गोत्रवध न करवे : मी न जुंझे’ : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ‘पाहाताचि त्यातें तूम्ही अभीळासाकारणें माराल : आन ते तूमतें मारीतील : आता तरि : अेथौनि करवीजताये : हे पाप तूज नाही : हे बाप भाऊ कव्हणी कव्हणाचे नव्हेति अेक सर्वज्ञवाचौणि : तूम्ही त्याचेया पोटा कीतीवेळ आलेति : आन ते तूमचेया पोटा कीतीवेळ आलेति’ : परि अर्जून श्रीकृष्णचक्रवर्त्तिचें (तें ? ‡ ) भणितलें न करीचि : रथाखाली ऊडी घातली : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति तयासि सावध केलें : मग मागौतें

‡ ‘तें’ या वर्णसंकेतावरच ‘चें’चा वर्णसंकेत गिरवून लिहिण्यात आलेला आहे. त्यामुळे याचे वाचन “... श्रीकृष्णचक्रवर्त्तितें भणितलें : ‘न करीचि’ :” असेही होऊ शकते.

रथावरि बैसवीलें : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति अर्जूनासि परावराचें ज्ञान केलें : सर्वज्ञें म्हणितलें 'अर्जून : सकळ सामूग्रीया सामूग्रीवंत अेकवाचूनि' ।१।: श्रीकृष्ण-चक्रवर्त्ति नीरोपीता अर्जून प्रतीबोधेचिना : मग अर्जूनदेवें भणितलें : 'आता आपूली शक्ती मज दयावी' : दीधली : तेव्हळि अर्जूनी वीस्वरूपशक्ती देखीली : ते ब्रह्मांड : सकळ (?) देवता : अतीवीश्याळ वीकराळ : भयान्नक : अन्येक भूजा : अन्येक शीरें : अन्येक नेत्रें : अन्येक आयूद्धें : अैसी वीचीत्र : तेव्हळि अर्जून भयान्नक रूप देखौणि भीयाला : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति तयासि पूढारें नीरोपण केलें :।: परीचें सादृश्य अवरी दावीलें : अैसें नीरोपण जालेंया : मग अर्जूनी भणितलें : 'जी जी : मी सर्वज्ञांचें वचन न लंघी : सर्वज्ञ म्हणतील ते वचन करीण' : मग अर्जून यूध्या प्रवर्त्तले : मग पाऊडा पावो : आन ब्रह्मवीद्या ऊपदेश : अर्जूनासि जाला" : ॥ ८९ ॥



श्री. अशोक चौसाळकर

# प्राचीन भारतीय गणराज्ये : काही विचार

परवापरवापर्यंत गणराज्ये हा पश्चिमेचाच वारसा समजला जात होता. पूर्वेकडील राज्यांना पौर्वात्य हुकूमशाही ( oriental despitism ) म्हणून संबोधिले जाई. म्हणूनच हेगेल म्हणू शकला की पूर्वेकडे फक्त एकाच माणसाचे राज्य चालते. परंतु इतिहासाचे नियम सार्वत्रिक असतात. गणापासून गण-राज्यांचा उदय होणे स्वाभाविकच होते मग ती पूर्व असो की पश्चिम. परंतु देशकालानुसार त्या संस्थांच्या स्वरूपामध्ये व आर्यप्रणालीमध्ये फरक पडत गेला तरी काही मूलभूत साम्यांचे दर्शन आपणास घडते. फक्त ग्रीक लोक-शाहीचा अभ्यास प्लेटो ॲरिस्टॉटल यांनी सुरू केला. त्यांच्या लिखाणातील लालित्य व बुद्धिवाद यामुळे सतराव्या अठराव्या शतकांतील पाश्चात्य विचार-वंतांना त्यांनी प्रभावित केले. फ्रेंच राज्यक्रांतीनंतर राजकीय तत्त्वज्ञानाचा जास्तच अभ्यास केला जाऊ लागला. प्राचीन भारतीय गणराज्यांची ग्रीक गणराज्यांशी तुलना करण्यात अर्थ नाही कारण ग्रीक गणराज्यांच्या कार्यप्रणाली व रचनेबाबत बरीचशी माहिती उपलब्ध आहे. त्यांचा शास्त्रीय अभ्यास झालेला आहे. भारतात त्याबाबत फारशी माहिती उपलब्ध नाही. भारतीय गणराज्ये ग्रीक गणराज्याप्रमाणेच होती म्हणण्यात अर्थ नाही. कारण भारतात गणराज्यवाद ( Republicanism ) ग्रीक गणराज्यवादाइतका विकसित झाला होता आणि गणपरंपरा लोकपरंपरेत रुजविण्याचे हेतुपूर्वक प्रयत्न झाले होते असे म्हणणे बरोबर नाही. गणराज्यवादाला आधारभूत असणारे राजकीय तत्त्वज्ञान पण येथे त्याप्रमाणात विकसित झालेले नाही पण याचा अर्थ असा नाही की भारतात गणराज्ये नव्हती.

डॉ. ऱ्हीस डेव्हिड्सने आपल्या Buddhist India मध्ये प्रथमच प्राचीन भारतात गणराज्ये अस्तित्वात असल्याचे सिद्ध केले. त्यानंतर डॉ. के. पी. जायसवालांनी आपल्या प्रखर प्रज्ञेच्या साह्याने प्राचीन भारतीय ग्रंथातील पुरावे एकत्र करून त्यांचे अस्तित्व सिद्ध केले. तो काळ स्वातंत्र्य आंदोलनाचा होता. डॉ. जायसवालांच्या संशोधनानंतर जास्तच जोमाने त्या दिशेने संशोधन

करण्याचे प्रयत्न सुरू झाले. डॉ. आर. सी. मजूमदार, डॉ. डी. आर. भांडारकर, डॉ. आर. के. मुखर्जी, डॉ. यू. एन्. घोषाल, डॉ. बेनीप्रसाद, डॉ. लॉ आणि प्रो. दिक्षितार यांनी जास्त सखोल अभ्यासास सुरुवात केली. आज प्राचीन भारतीय गणराज्यांचा मोठ्या प्रमाणात अभ्यास केला गेला आहे. डॉ. मुखर्जी व डॉ. सालेतोर यांनी त्यांचा ग्रीक गणराज्यांशी तुलनात्मक अभ्यास केला. डॉ. जे. पी शर्मा यांचे 'Republics in ancient India' आणि डॉ. शोभा मुखर्जी यांचे 'Republican trends in ancient India' ही नवी पुस्तकें प्राचीन गणराज्यांबद्दल बरीच माहिती देतात.

परंतु त्या क्षेत्रात पुराव्यांचा अभाव प्रकर्षाने जाणवतो. डॉ. कोसांबी म्हणतात त्याप्रमाणे प्राचीन भारतीय गणराज्यांच्या रचनेचा अभ्यास करणारा एकही ब्राह्मण प्लेटो किंवा ॲरिस्टॉटल पैदा झाला नाही.[1] त्यांचा कौटिल्याने अभ्यास केला पण त्यांचा नाश कसा करावा हे सांगण्यासाठी. बौद्ध धर्मग्रंथ पाणिनी, अर्थशास्त्र व शांतिपर्व अलेक्झँडर बरोबर आलेल्या ग्रीक लेखकांनी दिलेली माहिती, उपलब्ध नाणी आणि शिलालेख यांच्या आधारे त्यांचे स्वरूप व परंपरा यांचा मागोवा घेण्याचे प्रयत्न झाले आहेत.

वैदिक काळात गणराज्ये नव्हती असे डॉ. जायसवालांचे मत होते पण आता ते कुणीच बरोबर मानीत नाही. प्राचीन भारतीय गणराज्ये ही वेगवेगळ्या टोळ्यांची राज्यें होती. डी. चट्टोपाध्याय लिहितात "ते सर्व एकमेकांचे भाऊ होते आणि सर्व प्रकारची समानता त्यांच्यामध्ये पाळली जात असे. ते सर्वजण एकाच जागी रहात होते, मोठे झाले होते, ते एकाच कुलात जन्मलेले, मैत्रीच्या भावनेने रहाणारे आणि संघटित असे होते."[2] ह्या गणांची उत्पत्ती त्यांच्या एका कुलामधून झालेली होती. त्यामुळे ते एकमेकांशी त्या जातिगत भावनांनी जोडलेले होते. लढाईसाठी त्यांच्यामधील एकजण सेनापती म्हणून निवडला जात असे. वैदिक काळामध्ये इ. स. पू. पंधराव्या सोळाव्या शतकात सर्व भारतभर ह्या लहान लहान टोळ्यांची राज्यें होती. त्यांच्या स्वतःच्या अशा कुलपरंपरा होत्या. ते त्या पाळीत होते. शांततेच्या काळी त्यांच्यामध्ये कुणीच राजा नसे. राजघराण्यातील लोकांना समान अधिकार होते.[3] या टोळ्या अनार्य व आर्य होत्या. सुपीक मैदानात वसलेल्या टोळ्या आर्य होत्या आणि पंजाब, उत्तरप्रदेश, बिहार, नेपाळ या भागातील डोंगरात वसलेल्या टोळ्या अनार्य होत्या.

प्राचीन भारतीय गणराज्ये कुलगुरु वैद्य म्हणतात त्याप्रमाणे लहान होती. एक नगर व त्या भोवती असलेली शेतीयोग्य जमीन एवढाच त्यांचा विस्तार

असे. वैद्यांनीच प्रथम जनपद या संज्ञेचे महत्त्व जाणले आणि सिद्ध केले की विविध गणराज्यांची नावे त्या त्या टोळयांच्या नांवावरून पडली. आणि वैदिक वाङमयात त्यांचा उल्लेख हमेशा अनेक वचनात्मक असतो.[८] जनपद याचा अर्थ उत्तरवैदिककाळात टोळीचे रहाण्याचे ठिकाण असा होत गेला. नंतरच्या काळात त्याचा अर्थ ग्रामीण विभाग असा केला जाऊ लागला. जनपदांचा विकास लोखंडाचा शोध लागल्यानंतर झाला. उत्पादनाची सुधारलेली साधने उपलब्ध झाल्यानंतर भटकणाऱ्या आर्य टोळया गंगा-सिंधु-यमुनेच्या सुपीक प्रदेशात जंगल साफ करून राहू लागल्या. शेती, गोरक्षण यातून फायदा होतो ते त्यांना समजू लागले. व्यापारास सुरुवात झाली. परस्परातील संबंधातून, लढायातून नव्या सांस्कृतिक परंपरा निर्माण झाल्या. त्यातूनच राजेशाहीचा उदय झाला पण डोंगरातील टोळया हे मानायला तयार नव्हत्या. ब्राह्मणकाळात जनपदराज्यांनी प्रादेशिक अस्तित्व ग्रहण केले. जनपदराज्यांनी समान सांस्कृतिक परंपरा विकसित करण्यामध्ये महत्त्वाची भूमिका पार पाडली आहे.

पूर्व वैदिक काळात वेगवेगळया टोळयांचे राजे व त्यांना पाठिंबा देणारे पुरोहित स्वतःच्या सामर्थ्याच्या जोरावर दुसऱ्या टोळीवर हल्ला करून लढाईत मिळालेल्या लूटीवर रहात असत. उत्तरवैदिककाळात राज्यांची स्थापना वर्गहितावर झाली होती आणि राजन्यांना किंवा क्षत्रियांना व ब्राह्मणांना पोसण्यासाठी शेतीमधून अतिरिक्त उत्पन्नाची गरज होती. अतिरिक्त उत्पन्नासाठी स्वस्त मजुरीची आवश्यकता असते. शूद्र ते काम करीत होते. भारतात गुलामांचे काम शूद्रांनी केले. ते लढाईत जिंकलेले युद्धकैदी होते. त्यांच्यातील बरेचसे शूद्र आदिवासी गणांचा नाश करून गुलाम बनविलेले होते. ब्राह्मणांची आर्यसंस्कृती चहु अंगांनी फुलत होती. ती आता एक सांस्कृतिक परंपरा बनत होती. अश्वमेधासारखे विधी ब्राह्मणांनी या साहसांना धार्मिक रंग देण्यासाठीच शोधले. गणराज्यें पण यापासून दूर राहू शकली नाहीत. त्यांच्यामध्ये पण वैचारिक मंथन सुरू झाले.

वैदिक गणराज्यांची सुरुवात त्यांच्यात असलेल्या स्वायत्त टोळयांपासून होते. डॉ. जे. पी. शर्मा लिहितात की, वैदिक काळातील गणराज्यांच्या अध्यक्षस्थानी राजा होता पण तो निवडला जाई. राज्यात सभा व समिती यांचा राजावर बंधन ठेवणाऱ्या प्रतिनिधिसभा म्हणून उदय झाला. सभा हे कार्यकारीमंडळ होते तर समिती सर्व जनतेचे प्रतिनिधित्व करीत असे. वैदिक काळात चार प्रकारचे राज्यप्रकार किंवा राज्यघटना अस्तित्वात होत्या. विश् जनतेने

निवडलेले कार्यकारी मंडळ, सभेचे अधिपत्य असलेले. सभा-समित्यांचे अधिपत्य असलेले आणि सरदारांचे आधिपत्य असलेले.[५] डॉ. शर्मा यांचे पुरावे ठिसळ आहेत. डॉ. राजबली पांडेय यांनी अथर्ववेदात निवडणुकीचे एक सूक्त असल्याचे दाखवून दिले आहे परंतु लोकांनी निवडून दिले म्हणून राज्याचे गणराज्य होते असे नाही.[६]

ब्राह्मणयुगात जनपदराज्ये जास्त विकसित होत गेली. लोखंडाचा जास्त उपयोग होऊ लागला. शेतीपासून मिळणाऱ्या फायद्याचा उपयोग राजा खडी फौज उभारण्याकडे करू लागला. याच काळात गणसत्ता व राजसत्ता यांच्यात संघर्ष सुरू झाला. ब्राह्मण नेहमीच गणराज्यांच्या विरुद्ध होते. गणराज्यात त्यांच्या सांस्कृतिक परंपरांना स्थान नव्हते. त्यामुळे त्यांच्या विनाशासाठी ते प्रयत्न करीत असत. पण राजदरबारात पण आता दोन गट निर्माण झाले होते. एक गणसत्तेची व दुसरा राजसत्तेची तरफदारी करीत होता. संविधान ब्राह्मणात याचा उल्लेख आहे "मी राजेशाहीचा समर्थक आहे. तो गणराज्याचा समर्थक आहे. ( ११.७.५ ).

भारतीय युद्धाचा काळ हा ब्राह्मणांचा मानला जातो. भारतीय युद्ध कधी झाले याबाबत एकमत नसले तरी अहिच्छात्र हस्तिनापूर येथील उत्खननानंतर ९० वर्षांपूर्वी पार्जीटरने व त्यानंतर डॉ. रॉय चौधरी यांनी जो काल ठरविला होता तोच आज मान्य होत चालला आहे. युद्ध ९५० इ. स. पू. च्या आसपास झाले असावे असे पार्जिटरचे मत आहे. महाभारतात अनेक गणांचा उल्लेख सापडतो. अंधकवृष्णींच्या संघाबाबतच आपणास थोडीबहुत माहिती मिळते. अंधकवृष्णी संघात १८ कुले होती व ते द्वारकेस होते. सभापर्वातील अध्याय ४३ व शांतिपर्वातील अध्याय ८१ त्यादृष्टीने महत्वाचे आहेत. हा संघ पूर्वी मथुरेच्या आसपास रहात होता पण जरासंधाच्या भीतीने त्यांनी द्वारकेस पलायन केले. गणांचे स्थलांतर ही प्राचीन काळी नित्याचीच बाब होती. संघात अंधक, वृष्णी, भोज, शूरसेन, कुकुर, आदि १८ कुले होती. अंधकाची एकूण संख्या १८००० होती. ते खरे संघाचे शासक. ते संरक्षित अशा किल्ल्यात रहात असत. त्यांच्या सभागृहाचे नाव सुधर्म होते. त्यावर नियंत्रण ठेवण्यास सभापाल पण असे. ( महाभारत २.१४.४१–४४ ) शांतिपर्वातील ८१ वा अध्याय अतिशय महत्वाचा आहे. प्राचीन भारतीय गणराज्यात निर्माण होणाऱ्या राजकीय संकटांची व कार्यप्रणालीची त्यामध्ये आपणास माहिती मिळते. यादवांच्या संघामध्ये दोन संघ मुख्य होते. श्रीकृष्ण व उग्रसेन. वासुदेव किंवा श्रीकृष्ण तक्रार करतो की उग्रसेन व ज्ञातिबांधव यांच्यासाठी मी झटत असतानापण

माझे हृदय जाळणारे शब्द माझ्याविरुद्ध ते उच्चारीत असतात. उग्रसेनाने माझ्याविरुद्ध जे वातावरण निर्माण केले आहे त्याचा मी प्रतिरोध कसा करू ? नारद सांगतो की मधुरवाणीने सगळ्यांना विश्वासात घेतल्यानेच संघाचे कल्याण होईल. कारण संघामध्ये फूट झाली की अजिंक्य असणारे संघ तात्काळ नष्ट होतात.

यादवांचे राज्य हे गणराज्य होते हे इतर अनेक पुराव्याद्वारेसुद्धा सिद्ध करता येते. शिशुपाल सभापर्वात श्रीकृष्ण राजा नाही म्हणून त्यास अग्रपूजेचा मान द्यावयास तयार नाही ( महाभारत २.४३. ) पाणिनीचा काळ इ. स. पू. पांचवे शतक हा आहे. व त्यात पाणिनीने अंधकवृष्णीसंघाचा उल्लेख केलेला आहे. त्याने त्या संघामध्ये दोन पक्ष असल्याचा उल्लेख केला आहे व वासुदेव व आहुक त्यांचे संघमुख्य असल्याचे सांगतो. दोन पक्षातील स्पर्धेस द्वंद्व म्हणतात. येथे पाणिनी सांगतो की राजन्य किंवा क्षत्रिय हीच संघराज्यामध्ये राज्य करणारी जात होती.[७] त्यांच्यामध्ये सत्तेसाठी चालत असलेल्या स्पर्धेस तो व्युक्तिक्रम म्हणतो. काशिका सूत्रात याचा अर्थ सभागृहात एकमेकास विरोध करणारे व वेगळे बसणारे पक्ष असा दिला आहे. पाणिनीने दिलेली माहिती शांतिपर्वाच्या ८१ व्या अध्यायाचे ऐतिहासिकत्व व प्राचीनत्व सिद्ध करते. कौटिल्य पण अंधकवृष्णीसंघाचा उल्लेख करतो. ग्रीक लेखक लिहितो की हिरक्लीजने भारतामध्ये फार वर्षापूर्वी गणराज्य स्थापन केले होते. हा संदर्भ श्रीकृष्णाशी जुळतो. इ. स. च्या पहिल्या शतकातील अंधकवृष्णीचे नाणे पंजाबात मिळाले आहे. याचा अर्थ द्वारकेच्या नाशानंतर व आभीरांच्या आक्रमणानंतर यादवांच्या संघाने पंजाबात वसाहत केली होती हे सिद्ध होते. यादवांचे संघराज्य नऊ शतके टिकले.

बुद्ध साहित्यामध्ये गणराज्यांचा जास्त मोठ्या प्रमाणात उल्लेख सापडतो. याच काळात संघ व गण कल्पनांचे अर्थ स्पष्ट करण्यात आलेले आहेत. डॉ. शेंबवणकरांच्या मते संघ म्हणजे गणराज्य नाही तर राजेशाही असलेल्या राज्यांचे संघराज्य.[८] डॉ. घोषालांच्या मते संघ म्हणजे राज्य व गण म्हणजे राज्य करणारे लोक. म्हणूनच गणांचा उल्लेख नेहमीच अनेकवचनात्मक असतो. राजकीय गण म्हणजे त्या राज्यांवर राज्य करणारी गणसभा व संघ म्हणजे ते राज्य. डॉ. घोषालांच्या मते राजन्य किंवा क्षत्रिय गणसभेत शक्तिशाली होते व ब्राह्मणांना बिलकुल वाव नव्हता.[९] या गणांना जिंकून त्यांना मुख्य प्रवाहात आणण्याचे गंगायमुनेच्या खोऱ्यातील राजांनी प्रयत्न सुरू केले. चट्टोपाध्यायांच्या मते ह्या गणांचा नाश करून त्यांना निरनिराळ्या खेड्यात वसविले जात असे.

अनुक्रमणिका

कौटिल्याने पुरस्कारलेली नीती ज्यामध्ये साम-दाम, दंडभेदाचा उपयोग करून संघ तोडण्याचा उपदेश आहे त्याच्या पूर्वी कित्येक शतके स्वीकारली गेली होती. बहुतेक टोळीवाले शूद्र म्हणून वर्णव्यवस्थेत भरती करण्यात आले.[१०]

बुद्धाच्या काळात, जेंव्हा व्यापार हा महत्त्वाचा धंदा मानला जात होता. गणराज्ये बरीच शक्तिशाली होती. नृपसत्तेविरुद्ध त्यांनी संघ तयार केले होते. सिंधूच्या खोऱ्यात व ईशान्येकडे ते जास्त शक्तिशाली होते. बौद्धांनी व जैनांनी वर्णिलेल्या सोळा महाजनपदात अनेक गणराज्यांचा समावेश आहे. इतिहासात अशीही उदाहरणे आहेत की अनेक नृपसत्ता असलेल्या राज्यांनी गणसत्ता स्वीकारली आहे. विदेहांचे राज्य वैदिककाळात नृपराज्य होते. ते बुद्धाच्या काळात अनेक स्वायत्त गणराज्यात विभागले होते. कुरुपांचाल बुद्धाच्या व कौटिल्याचे वेळी गणराज्ये होती.

प्राचीन भारतातील वेगवेगळ्या राज्यप्रकाराबद्दल एका जुन्या जैन ग्रंथात आचरंगसूत्र ( २.३१ ) उल्लेख सापडतो. अराज्य, गणराज्य, युवराज्य, द्वैराज्य, वैराज्य, व विरुद्धराज्य हे ते प्रकार. विरुद्धराज्य वैराज्य व अराज्य यांचे अर्थ स्पष्ट नाहीत. अराज्य म्हणजे राजा नसलेली टोळी व वैराज्य म्हणजे परकीयांचे राज्य असे डॉ. घोषालांचे मत आहे.[११]

बुद्धकालीन गणराज्यात राजन्य व क्षत्रिय हा राज्यकर्ता पक्ष होता. वैशालीचे गणराज्य हे त्या काळातील एक महत्त्वाचे गणराज्य लिच्छवींच्या गणराज्यात ७७०७ गण राज्य करीत होते वज्जींच्या संघराज्याचा लिच्छवी गणराज्य एक भाग होता. शाक्यांचा पण त्यात समावेश होतो. राज्यकर्त्या कुलातील सर्व सदस्य राजसभेचे सदस्य होते. कोलिया मोरिया मल्ल. नय वगैरे गण त्या संघाचे सदस्य होते. लिच्छवींचे राज्य नऊ गणराजे करीत असत. १८ इतर गणराजे ९ लिच्छवी मंत्री व ९ मल्लांचे मंत्री या ३६ जणांची मिळून वज्जी संघराज्याची सार्वजनिक सभा अस्तित्वात होती जीमध्ये शत्रूने आक्रमण केल्यास कोणत्या धोरणाचा अंगिकार करावयाचा त्याविषयी विचारविमर्श होत असे. बाकी बाबतीत ती स्वायत्त होती. प्राचीन भारतात ही लहान लहान गणराज्ये संघ बनविल्याशिवाय शक्तिशाली राजांच्या खड्या फौजांना तोंड देऊ शकत नसत.

वैशाली गणराज्याचा सेनापती मरण पावला त्यावेळी विदेहराजाचा मंत्री खांड वैशालीस आला होता. त्याच्या वर्तनाने प्रभावित होऊन लिच्छवींनी त्याला आपला सेनापती नेमले. त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या वडील मुलाला बाजूला

अनुक्रमणिका

थोरून धाकटा मुलगा सिंह याला सेनापती बनविले. आपल्या थोरल्या भावासाठी सिंह ती जागा स्वीकारत नव्हता तेव्हा त्याला सांगण्यात आले की सेनापतीची जागा वंशपरंपरागत नाही आणि कुणाला सेनापती करावयाचे हे संपूर्णतः गणाच्या मर्जीवर आहे. खांडाच्या नांवाने जी आज्ञापत्रे निघाली होती ती सिंहाच्या नांवाने करण्यात आली. गणसभा नेहमी बोलाविल्या जात असत व राजसत्तेवर त्यांचे चांगलेच नियंत्रण होते.

याच काळात चार अतिशय शक्तिशाली नृपसत्ता या सुपीक प्रदेशाचा ताबा मिळविण्यासाठी झगडत होत्या. मगधचा अजातशत्रू, वत्सदेशाचा कोसांबीचा उदयन, उज्जैनचा प्रद्योत व कोसल देशाचा प्रसेनजित. हे राजे तत्कालीन गणराज्यांचा किंवा संघांच्या तुलनेने अतिशय शक्तिशाली होते. त्यांच्या भीती-मुळेच गणराज्यांनी आपले संघ स्थापित झाले होते. याचवेळी सिंधु खोऱ्यात असंख्य गणराज्यें अस्तित्वात होती. चंद्रगुप्त मौर्याने अलेक्झँडरच्या स्वारीनंतर त्यांना जिंकून घेतले. पण मौर्यांच्या सत्तेला उतरती कळा लागताच त्यांनी पुनः डोके वर काढले. आणि इ. स. च्या चौथ्या शतकांपर्यंत ते अस्तित्वात होते. पूर्वेकडची गणराज्ये मगधाच्या साम्राज्यवादापुढे टिकू शकली नाहीत. पण सिंधू खोऱ्यात त्यांनी बरेच वर्षे आपले अस्तित्व टिकवून धरले.

अलेक्झँडर बरोबर आलेल्या वृत्तांतकारांनी सिंधु खोऱ्यातील भारतीय गणराज्यांचे दोन भागात विभाजन केले आहे. १) महाजनशाही आणि २) लोक-शाही. या राज्यांतील सर्वोच्च सत्ता सभागृहाच्या हातात होती. न्यासांचे कार्यकारीमंडळ ३०० सभासदांचे होते तर यौधेयांचे कार्यकारीमंडळ ५०० सदस्यांचे होते. अंबष्ठांची राज्यघटना लोकसत्तात्मक होती त्यांनी तीन सेनापती अलेक्झँडरविरुद्ध लढण्यासाठी निवडले होते. क्षुद्रकांनी व मालवांनी ग्रीकांविरुद्ध लढण्यासाठी संघ बनविला होता. डायडोरस लिहितो की मोफिटीस (?) राज्यात स्पार्टासारखे अव्यंग मुलांचे पोषण राज्य करीत असे. मौसिकनोस गणराज्यात गुलामगिरी नव्हती असे स्ट्रॅबो लिहितो. त्यांच्या कायद्याप्रमाणे बलात्कार किंवा खून याशिवाय दुसऱ्या कोणत्याही गुन्ह्यास कायदा शिक्षा देत नसे. कारण माणसांचे परस्पर संबंध करारावर आधारलेले आहेत, ज्याच्या आधारे प्रत्येकजण आपले हितरक्षण करू शकेल. त्या राज्यावर अलेक्झँडर पण खूष झाला इतके ते स्वच्छ व सुंदर होते. असे ॲरियन लिहितो.[११]

कौटिल्याने आपल्या अर्थशास्त्रात (XII) गणांचा उल्लेख केला आहे. संघाचे त्याने दोन भागात विभाजन केले आहे. आयुधजीवी संघ व राजशब्दोपजीवी संघ. आयुधजीवी संघांचा पाणिनी पण उल्लेख करतो. काही

संघांच्या प्रमुखांना राजा संबोधले जाते कौटिल्याच्या मते संघ अजिक्य असतात कारण त्यांच्यापुढे राजांची भाडोत्री सेना टिकू शकत नाही. कौटिल्य राजाला त्यांच्यात फूट पाडण्यास सांगतो. अजातशत्रूने याच मार्गाने लिच्छवींचा नाश केला.

पण मौर्यांच्या अस्तानंतर पंजाबमध्ये पुनः गणराज्यांनी वर डोके काढले. शांतिपर्वातील अध्याय १०७ याच काळात लिहिला गेलेला आहे. भीष्म येथे गणांच्या समस्यांचा सहानुभूतीपूर्वक विचार करतो. डॉ. मजूमदारांच्या मते येथे भीष्माने नव्या राजकीय सिद्धांताचे समर्थन केले आहे आणि कौटिल्याच्या विचारांची ती प्रतिक्रिया आहे.[११] भीष्म या अध्यायात गणांनी आपल्या अडचणी कशा दूर कराव्या हे सांगतो. गणांनी नेहेमीच फूट टाळावी, एक लहानसे कार्यकारीमंडळ बनवून राज्यकारभार करावा असे सर्वच विचारवंतांनी नारद, बुद्ध व कौटिल्याने सांगितले आहे. गणांना मुख्य धोका अंतर्गत फुटीपासून आहे. इ. स. च्या पहिल्या शतकात मालव, यौधेय, क्षुद्रक, औदुंबर, अंधकवृष्णी वगैरे गणांचा पुनः उदय झाला. मालवगणाच्या नाण्यावर 'मालव गणाचा विजय असो' यौधेय गणाच्या नाण्यावर 'यौधेय गणाचा विजय असो' असे लिहिलेले आहे. त्यांच्या कार्यप्रणालीबद्दल फारशी माहिती उपलब्ध नाही.

प्राचीन भारतीय गणराज्यांनी जवळजवळ दीड हजार वर्षे टिकाव धरला. कार्यकारी मंडळ राजाज्ञा व गणसभेकडून संमत झालेले ठराव यांच्या आधारे राज्य चालवीत असे. गणसभा सेनापतींची निवड करीत असत. राजाज्ञा सेनापती व गण यांच्या नांवाने प्रसिद्ध केल्या जात. गौतमबुद्धाच्या भिक्षुसंघाची संघटना व कार्यप्रणाली लोकसत्तात्मक आहे. इतिहासकारांचे असे मत आहे की ही कार्यप्रणाली बुद्धाने तत्कालीन संघराज्यांच्या राज्यघटनेवरून घेतली आहे. याला पुरावा नाही. पण कोणतीही कल्पना आकाशातून पडत नसते. तिच्या मागे तिच्या विकासाचा इतिहास असतो. भिक्षुसंघ त्यापूर्वी कुणीच संघटित केले नव्हते. बुद्धाची पृष्ठभूमी गणराज्याची आहे. त्यामुळे त्याने संघांच्या गणसभेची कार्यप्रणाली उचलली असावी ह्या मताला निश्चितच अर्थ आहे. पुराव्या अभावी आपण फारसे पुढे जाऊ शकत नाही पण तशी जर राज्यघटना भारतात अस्तित्वात असेल तर भारतीय गणराज्यवादाने बरीच प्रगती केली होती असे समजायला हरकत नसावी.

भारतात राज्यशास्त्रावरील लिखाण ब्राह्मणांनी केले आहे जे नृपसत्तेचे पुरस्कर्ते होते. ब्राह्मणांच्या मते गणराज्ये व्रात्य होती. निरनिराळ्या राज्यघटनांचा तुलनात्मक अभ्यास करण्याची वृत्ती भारतात कधीच नव्हती. भारतीय राज्य-

अनुक्रमणिका

शास्त्रज्ञांचा भर प्रात्यक्षिकांकडे जास्त होता. प्राचीन भारतीय अर्थशास्त्र-शिक्षकांना गणांबाबत सहानुभूती नव्हती त्यांनी गणांना कसे तोडावे ह्याचेच शिक्षण त्यांच्या शिष्यांना दिले.

भारतात गणराज्यवादाला फारसे तात्त्विक अधिष्ठान लाभले नसले तरी प्राचीन भारतीय विचारवंतांनी प्रतिपादित केलेला सामाजिक कराराचा सिद्धांत गणराज्यांचा अभ्यास करूनच प्रतिपादिला असावा. बौद्धांनी ' महासम्मत'ची कल्पना मांडली. समाजात निर्माण झालेली अस्थिरता दूर करण्यासाठी सर्व लोक एकत्र झाले व सर्वांच्या संमतीने एकाची राजा म्हणून निवड झाली. त्याने संरक्षण करावयाचे व त्याला जनतेने आपल्या भातातील कांही भाग द्यायचा हे ठरले. महासम्मताची निवडणूक हे क्षत्रियांच्या उदयाचे कारण. ह्या सिद्धांताचा प्रभाव महाभारतातील सामाजिक कराराच्या सिद्धांतांवर पडलेला आहे. येथे राजाच्या निवडणुकीस जनतेची संमती आवश्यक ठरविली आहे. महाभारतात याचा जास्त विचार करून सांगितले गेले आहे की राजा संरक्षण करतो म्हणून लोक कर देतात राजा जर संरक्षण करीत नसेल. तर त्याला लोकांनी हाकलून द्यावे किंवा ठार मारावे. ही भारतीय गणराज्यांची भारतीय राजकीय तत्त्वज्ञानाला देणगी आहे. प्राचीन भारतीय गणराज्ये कुलपरंपरा महत्त्वाच्या मानीत व त्यांचा कायदा त्यांच्या जातीय कुलपरंपरा होत्या. म्हणूनच गौतमबुद्धाने व भीष्माने त्यांना त्यांच्या परंपरा जपण्याचे, ज्यांच्या आधारावर ते उभे होते त्यानुसार सांगितले आहे.

गणराज्यें काळाच्या प्रवाहाबरोबर बदलण्यास तयार नव्हती. गणराज्ये एका कुलाच्या व जातीच्या आधिपत्याखाली असलेल्या प्रतिगामी सत्तांनी प्रभावित झालेली होती. सर्व जनतेला त्यांच्या कार्यप्रणालीत भाग घेता येत नव्हता फक्त राजन्य किंवा क्षत्रियांनाच वर उल्लेखिलेले राजकीय अधिकार प्राप्त होते. गणराज्यांत इतर वर्गांची परिस्थिती अतिशय खराब होती. ही गणराज्ये मूलतः आयुधजीवी संघ होते. त्यामुळे राजन्य तेथे शक्तिशाली होते. वर्णव्यवस्था व दासप्रथा तेथे अस्तित्वात होती. बोंगार्ड लेविनचे असे मत आहे की भूमीवर क्षत्रियांची मालकी होती व गुलामांना व शूद्रांना त्यांच्यासाठी काम करावे लागे. वैश्यांची परिस्थितीपण फारशी चांगली नव्हती. ब्राह्मणांनी निर्माण केलेली वर्णव्यवस्था ही गणराज्यें नष्ट करू शकली नाहीत. नंतर तर शूद्रांच्या व गुलामांच्या मदतीच्या शिवाय आपली सत्ता टिकत नाही हे त्यांना कळून चुकले. गणराज्यांनी गुलामीला जास्तच पाठिंबा दिला.[१४]

उत्तर वैदिककाळात व बुद्धकाळात गणराज्यें हा लोकप्रिय राज्यप्रकार होता. कारण समाजाची कुलबंधने, ज्ञातीबंधने तुटलेली नव्हती. प्रत्येक टोळीची स्वतःची अशी टोटेमिक परंपरा होती. ती परंपरा जपण्यात ही राज्यें कृतकृत्यता मानीत होती. गणराज्ये राजन्यांच्या नेतृत्वाखाली होती ज्यांचे प्रभुत्त्व त्यांच्या युद्धसामर्थ्यावर होते. रोमन कौन्सल सारखाच सेनापती पण मुख्यकार्यकारी अधिकारी होता. गणराज्याचे अर्थकारण शूद्रांवर आधारलेले होते. घटनात्मक-दृष्टया प्राचीन भारतीय गणराज्ये महाजनसत्तात्मक (Aristocratic) होती.

हे फार दिवस चालणे शक्य नव्हते. मगध आणि कोसल देशांच्या राजपदी महत्त्वाकांक्षी राजे आले. त्यांची राज्ये मोठी होती. मगधात लोखंड मोठ्या प्रमाणात उपलब्ध होते. सुपीक जमिनीतून अतिरिक्त उत्पन्न पण मिळत होते. त्यांनी खडया फौजा ठेवल्या होत्या. गणांसारखा त्यांचा दृष्टिकोण परंपरागत नव्हता. पाचव्या सहाव्या शतकातील सामाजिक क्रांतीमुळे व आंदोलनांमुळे जनमानस ढवळले होते. हे सारे ओळखण्याइतके अजातशत्रू प्रसेनजित, प्रद्योत व उदयन चलाख होते. वरचेवर जंगले तोडून शूद्रांना व वैश्यांना जमिनीची मालकी देऊन व्यापारास प्रोत्साहन देऊन त्यांच्याकडून सारा वसूल करणे जास्त फायद्याचे आहे हे त्यांनी ओळखले होते. त्यामुळे भूदासांची पद्धत बंद पडत गेली व गुलामी घरकामापुरतीच मर्यादित राहिली. अजात-शत्रूच्या या धोरणाचा फायदा महापद्माने घेतला. त्याने शेकडो संघ जिंकून घेऊन दुसरा परशुराम हे नांव सार्थक केले. पश्चिमेकडची गणराज्ये चौथ्या शतकापर्यंत टिकून राहिली. कारण मगध साम्राज्यवाद तेथपर्यंत पोहोचला नव्हता. अले-क्झांडरने खिळखिळीत केलेल्या गणांची सत्ता चंद्रगुप्त मौर्याने संपुष्टात आणली. मौर्यांची शासनपद्धती व अशोकाचा सुधारणावादी उदार दृष्टिकोण यामुळे पूर्वेकडील गणराज्यें त्यांच्या परंपरा तोडू शकली पण अशोकाचा संदेश पश्चिमेकडे इतका प्रभावशाली असणे शक्य नव्हते. पश्चिमेत त्यांचा पुनः उदय झाला पण त्यात जुना जोर नव्हता व त्यांना सारखे स्थलांतर करावे लागले.

गणराज्ये कालप्रवाहात तगणे शक्य नव्हते. ते कुठेच तगले नाहीत. भारतात ते प्रतिगामी व कालबाह्य परंपरांचे पालन करू पहात होते. त्यांच्या विसर्जनानंतर त्यांच्या अनेक परंपरा भारतीय संस्कृतीत सामील झाल्या. त्यांनी भारतीय लोकपरंपरांच्या विकासास हातभार लावला. सामाजिक कराराचा सिद्धांत व राजाच्या अधिकारशक्तीची मर्यादा हे दोन सिद्धांत राजकीय तत्त्वज्ञानाला गणराज्यांची देणगी आहे. प्राचीन भारतातील गणसभांसारखे

स्वातंत्र्य भोगणाऱ्या ग्रामसभा एकोणिसाव्या शतकापर्यंत भारतात अस्तित्वात होत्या. त्यातील मंत्रणातत्त्व प्राचीन गणसभेचाच वारसा होता. अंबष्ठांची लोकशाही कशाप्रकारची होती हे ग्रीकांनी स्पष्ट केलेले नाही. मौसिकनोस बद्दलची स्ट्रॅबोची माहिती खरी असेल तर भारतीय गणराज्यांची बरीच लोकशाहीतत्त्वे अमलांत आणली होती हे मान्य करावे लागते. भिक्षुसंघाची रचना पण अशीच लोकशाहीतत्वावर आधारलेली आहे.

सर्वच क्षेत्रात गणराज्यांचे योगदान आश्चर्यकारी आहे. श्रीकृष्ण, गौतमबुद्ध, महावीर वर्धमान, चंद्रगुप्त मौर्य ( मोरिया टोळी ) कौटिल्य, पाणिनी ( तक्षशिला ) यांच्यासारखे थोर पुरुष गणराज्यातच जन्मले. कठोपनिषदासारखे श्रेष्ठ उपनिषद कठांनीच रचले. भारतात जे अवैदिक तत्वज्ञान निर्माण झाले त्याला प्रेरणा व आश्रय गणांनीच दिला.

परंतु त्यांची ग्रीक गणराज्यांची तुलना करण्यात अर्थ नाही. प्रत्येक भारतीय सिद्धांताची ग्रीकांच्या सिद्धातांशी तुलना करण्यात व त्यातील साधर्म्य शोधण्यात फारसा अर्थ आहे असे मला वाटत नाही. कारण ग्रीकांच्या समस्या वेगळ्या होत्या. प्राचीन भारतीयांच्या समस्या वेगळ्या होत्या. एखाद्या संस्कृतीचे श्रेष्ठत्व प्रतिपादन करण्यासाठी या तुलनात्मक अभ्यासाचा उपयोग करण्याऐवजी दोन्ही संस्कृतींचा त्यांच्या संदर्भात विचार करून त्यांची वैशिष्टचे सांगणे जास्त महत्त्वाचे आहे. ग्रीकांच्या राज्यांचा विकास वेगळ्या तत्त्वावर झाला. ग्रीकांच्या नगरराज्यात ( polis ) जी राजकीय जागरूकता जाणवते ती भारतात जाणवत नाही. ग्रीकांनी लोकसत्तेसाठी व प्रतिनिधित्वासाठी सत्ताधाऱ्यांशी लढे दिले, भारतात तशी उदाहरणे नाहीत. भारतातील वर्णव्यवस्थेमुळे व गणांच्या परंपराप्रेमामुळे तशा मोठ्या चळवळी येथे झाल्या नाहीत. भारतीय गणराज्यांची प्रेरणाशक्ती स्वातंत्र्य व व्यक्तीचा संपूर्ण विकास नव्हती त्यांना परंपरा पाळण्यात, आहे ते जपून ठेवण्यात जास्त रस होता. ग्रीकांच्या लोकशाहीच्या मर्यादा पण आपण जाणल्या पाहिजेत. तेथे पण लाखो गुलामाना जे बहुसंख्य होते. मतदानाचा अधिकार नव्हता. पण ग्रीक सोफिस्टांनी ग्रीसमध्ये एकप्रकारचे राजकीय वातावरण निर्माण केले होते. ग्रीक शिष्टजन ( elites ) त्यांच्या हाताखाली शिकून सामाजिक व राजकीय जीवनासाठी तयार होत असत. ग्रीक नगरराज्य हे अतिशय तीव्र व प्रभावी अशा राजकीय हालचालींचे केंद्र होते. ग्रीसमध्ये राजकीय व नागरिक मूल्यांचा विकास झाला. भारतातील अर्थशास्त्रशिक्षक लोकायतांच्या तुच्छता-

वादी भोगवादातून तयार झालेले. त्यांना अर्थशास्त्र (राज्यशास्त्र) फक्त राजांना व राजपुत्रांना शिकवायचे होते. शासनयंत्रणेचा त्यानी खोलवर विचार केला पण त्याखाली असलेल्या तत्त्वज्ञानाला त्यानी लोकवादी बनविले नाही. असलेल्या लोकसंख्येची पातळी वर कशी उचलावी, त्यांना कोणती राज्य-घटना उपयुक्त होईल ही प्लेटो ॲरिस्टॉटलची समस्या होती. तर सतत रुंदावत जाणाऱ्या नव्या नव्या वन्य टोळयांना आपल्यात समाविष्ट करून घेणाऱ्या जनपदांनी राज्य कसे राखावे, जनतेला शांत कसे ठेवावे, नव्याने लागवडीस आणलेल्या जमिनीतून येणाऱ्या साऱ्यांचा राज्यवृद्धीसाठी कसा उपयोग करावा ही भारतीय अर्थशास्त्रज्ञांची समस्या! त्याना जनपदाच्या लोकसंख्येत नव्याने सामील झालेल्या तत्त्वांना मुख्य प्रवाहात सामील करून घेण्यासाठी धर्म, वर्ण व कर्म या कल्पनांचा वापर करावा लागला. त्यांच्यातील व्यवहारवाद नव्या राज्यघटनांचा अभ्यास करण्यास तयार नव्हता. ग्रीकांनापण नव्या साम्राज्यवादाची चाहूल लागली नव्हती.

भारतीय गणराज्यांची परंपरा शबल आहे. धर्मकल्पनेचा उपयोग व्यक्ती, समाज व राज्य यांच्या संदर्भात फार उशीरा करण्यात आला. वर्णव्यवस्था शक्तिशाली झाल्यानंतर धर्मकल्पनेला फारसे काही करता येणे शक्यच नव्हते. गौतमबुद्धाने पण वर्णव्यवस्था प्रमाण मानली कारण शूद्र शेतकऱ्यांनी निर्माण केलेल्या अतिरिक्त उत्पन्नावर सर्व जाती जगत होत्या आणि तत्त्वज्ञानाचे पाय-त्याने आकाशात कितीही भरा-या मारल्या तरी स्वतःच्या स्वार्थाच्या–वास्त-वाच्या जमिनीवर असतात. लोकायतांचा नास्तिकवाद भोगवादात व तुच्छता-वादात समाप्त झाला. त्याला सामाजिक अर्थ देण्याचा प्रयत्न झाला नाही.

संदर्भ —

1) Dr. D. D. Kosambi– Ancient Indian civilisation and culture.

2) D. Chattopadhyay. Lokayatas.

3) Zimer. McDonell. Vedic index Vol. II 216.

4) C. V. Vaidya. Epic India.

5) Dr. J. P. Sharma. Republics in ancient India.

अनुक्रमणिका






6 ) Dr. Rajbali Pandey. " The hymn of election in Atharvaveda and its political implications 86–90 ( Indian History Congress proceedings– 14 th Session. Jaipur 1951. )

7 ) Dr. Agrawal V. S. India as known to Panini.

8 ) Dr. Shembvankar Samghas in Panini–137–40. Annals of Bhandarkar oriental research Institute Vol. 25 1944.

9 ) Dr. U. N. Ghoshal The Constitutional Significance of Sangha and Gana in the post Vedic India– 61–64. Indian culture Vol. 12 1945–46.

10 ) D. Chattopadhyay. Lokayatas.

11 ) Dr. U. N. Ghoshal. A History of Indian public life. Vol. II 31.

12 ) ,, ,, ,, Vol. II 212–13.

13 ) Dr. R. C. Majumdar Corporate life in ancient India. 246–47.

14 ) G. M. B. Levin. I ) Some basic problems of Mauryan India 1–12.

II ) On some features of the Varna System in the Gana and Samgha in ancient India 277–80. Indian Studies. Vol. 13, 1971–72.



श्री. आनंद ना० कुंभार

## स्पष्ट कालोल्लेखित आद्य मराठी शिलालेख

# संगमेश्वर मंदीर कुडल येथील शके ९४० चा मराठी शिलालेख

### प्रास्ताविक

गेल्या तीन चार वर्षांपासून सोलापूरच्या आसमंतातील कोरीव लेखांचा मी फसून शोध घेत आहे. त्या निमित्त आतापर्यंत तीन तालुक्यांतील जवळ जवळ सव्वाशें खेडी आणि त्यांच्या परिसरांतील भाग रानोमाळ पायाखाली तुडवीला आहे. उ. सोलापूर, द. सोलापूर आणि मोहोळ हे ते तीन तालुके होत. ह्या भटकंतींमध्ये मला पुष्कळसे लेख सांपडले आहेत. त्यापैकी बरेचसे लेख अद्यापि अप्रकाशित आहेत. बहुतेक शिलालेख कन्नड लिपी व भाषेत आहेत. नागरी लिपीतील मराठी आणि संस्कृत लेख अगदी तुरळक प्रमाणात सांपडतात. ह्या सर्व लेखांचे वाचन व संपादन व्हावयास हवे. मला वाटते त्यामुळे ह्या बाजूच्या एकाद्या नव्या राजवंशावर प्रकाश पडून तो उजेडात येईल. असाच शोध घेत असता मला गेल्या डिसेंबर १९७४ मध्ये मराठी भाषेतील एक अगदी स्पष्ट कालोल्लेखित आद्य शिलालेख सांपडला आहे. तो अद्यापी अप्रकाशित आहे. त्याचा उल्लेख सुद्धा आतापर्यंत कोणी केला नाही. म्हणून तो येथे प्रथमच प्रसिद्ध होत आहे.

### उपलब्धि

हा लेख कुडल ( ता. द. सोलापूर, जिल्हा सोलापूर ) येथील संगमेश्वर देवळात सभामंडपाच्या एका तुळईवर खोदलेला आहे. कुडल हे गांव सोलापूरच्या दक्षिणेस सुमारे पंचवीस मैलावरील भीमा–सिना नदीच्या संगमावर आहे आणि त्याच ठिकाणी संगमेश्वर मंदीर आहे. लेख कोरल्यापासून आहे त्या ठिकाणीच आहे. त्यामध्ये काही तूटफूट नाही. हवामानाचा जो काही परिणाम झाला

अनुक्रमणिका






असावा तेवढाच. परंतु लेख मुळात वर वर खोदल्यामुळे काही ठिकाणची अक्षरे लागत नाहीत व त्यांपासून स्पष्ट असा अर्थ निघत नाही. याच देवळाच्या मंडपाबाहेर आणखी एक शिलालेख आहे. तो कन्नड लिपि व भाषेत आहे. ( कदाचित संस्कृत भाषेतही असेल. ) माझ्या माहितीनुसार त्याचेही अद्यापि वाचन झालेले नाही. त्याचा आकार साधारणपणे ६ फूट लांब, ३–३.। फूट रुंद आहे. सध्या त्याचे दोन तुकडे होऊन पडले आहेत. ह्या लेखांकडे अत्यंत दुर्लक्ष होत आहे. ह्या संगमेश्वर मंदिराशेजारी पूर्वेस एक शिल्पसौंदर्यानी नटलेले आणखी एक समाधिमंदीर आहे. त्याठिकाणी दोन कन्नड-मराठी शिलालेख आहेत.[१]

## वर्णन

ह्या मराठी लेखाची लांबी ९४ सें. मी. व रुंदी १६ सें. मी. आहे. तुळईची शिळा घडीव आहे. लेख खोदण्यापूर्वी शिळा गुळगुळीत वगैरे केलेली नाही. साधारण सफाईदार जागापाहूनच लेख खोदलेला आहे. लेख अवघ्या अडीच ओळीचा आहे. ह्या अडीच ओळीत अनुक्रमे २७, २६, ९ अशी अक्षरे आहेत. अक्षरांची उंची सुमारे ४ सें. मी. पर्यंत आहे अक्षरे सुंदर, सुबक अशी आहेत. लेख कोरक्याने काळजीपूर्वक खोदलेला आहे. पण कोरक्याने धरसोडीची वृत्ती दाखवून डाव्या बाजूकडील अक्षरे फारच वरवर खोदली असल्यामुळे त्या भागांतील दोन ओळीतील अक्षरे वाचणे जिकीरीचे झाले आहे. एकंदरीत लेख सुस्थितीत आहे असे म्हणावे लागेल.

## अक्षरवाटिका, लेखन पद्धति व भाषा

लेखांतील अक्षरे नवव्या दहाव्या शतकांतील इतर नागरी लिपीतील कोरीव लेखांप्रमाणे आहेत. लेख लहान असल्यामुळे त्यात लेखन-वैशिष्टय क्वचितच दृष्टोत्पत्तीस येते. अक्षरांवरील अनुस्वार पोकळ आहेत. लेखाच्या सुरवातीस 'स्वस्ति' हे जे शब्द कोरले आहेत, तो शब्द वाचणे, कोरीव लेखांचा ज्यांचा गाढा अभ्यास आहे त्यानांच वाचणे शक्य आहे. वास्तविक तो शब्द अगदी स्पष्ट आहे. तो शब्द 'स्वस्ति' असा लावून देण्यात गुरुवर्य म. म. डॉ. वा. वि. मिराशी नागपूर यांचे बहुमोल सहाय झाले आहे. लेख नागरी लिपि आणि मराठी भाषेत आहे. हे त्याचे खास वैशिष्टय आहे.

---

१. त्यांची माहिती सोबत जोडलेल्या पुरवणी लेखांत दिली आहे जिज्ञासूनी जरूर पहावे.

अनुक्रमणिका

## कालनिर्देश

कालनिर्देश पहिल्याच ओळीत आला आहे. तो असा 'सकु ९४० कालयुक्त संवत्सरे.' कालासंबंधी इतर तपशील त्यात आलेला नाही शकाशी व संवत्सराशी बरोबर मेळ बसून त्याचा इसवी सन १०१८ असा येतो.[२] दक्षिणेतील कोरीव लेखात शक चालू तर संवत्सर गत वर्षाचा असा असतो. परंतु काही लेखातून दोन्ही एकाच वर्षाची म्हणजे चालू वर्षाचीच असतात.

## आशय आणि चर्चा

या शिलालेखातून इतिहासात भर पडेल अशी कोणत्याही प्रकारची माहिती मिळत नाही आणि कोणत्याही राजवंशाचा यात निर्देश नाही. म्हणून हा लेख इतिहासाच्या दृष्टीने निरुपद्रवी ठरतो. आशयाच्या बाबतीत निश्चित असे काही सांगता आले नाही तरी लेखातील लागलेल्या भागावरून काही अनुमान करता येते ते असे. शके ९४० कालयुक्त संवत्सर असताना कोणी एका पंडिताने संगमेश्वर मंदिरास भेट दिली होती. त्यावेळी त्यास एक सहस्र निष्क ( त्या काळची प्रचलीत नाणी ) देण्यात आले. आणि शेवटी हा लेख वाचणारा विजयी होवो, असा आशीर्वाद दिला आहे.

## हा पंडित कोण ?

लेखाच्या दुसऱ्या ओळीत 'पंडीत' म्हणून जो उल्लेख आला आहे त्याचा समाधानकारक उलगडा करता येईनासा झाला आहे. 'पंडीत' हा शब्द विद्वत्तादर्शक आहे का तो दक्षिणेतील एखादा संप्रदाय निदर्शक आहे. हे साधना अभावी समजेनासे झाले आहे. कारण 'पंडीत' हा शब्द इकडील इतर कोरीव लेखांतूनसुद्धा डोकावतो.[३] साधनाअभावी जास्त चर्चा करणे तूर्त तरी शक्य नाही.

कुडल येथील एका दुसऱ्या मंदिरातील शिलालेखात 'पंडीत' म्हणून शब्द आला आहे, त्याबाबतीत अधिक माहिती ह्या लेखाच्या सोबतची पुरवणी पहाणे.

---

२. संशोधकाचा मित्र भा. १ ला– ग. ह. खरे. १९५१ पृ. ९५.

३. सोलापूरच्या किल्ल्यात एक मराठी शिलालेख आहे. त्यात काल उल्लेख नाही. पण अक्षरवाटिकेवरून तो ११।१२ शतकातील ठरावा. त्यातसुद्धा 'पंडीत' शब्द आला आहे.

अनुक्रमणिका

## मराठीचा आद्य लेख कोणता ?

प्रत्येक क्षेत्राच्या संशोधनात नित्य नवे शोध लागतात. संशोधक अत्यंत चिकाटीने आणि परिश्रमाने नवे नवे शोध लावतात व नवी साधनसामग्री उजेडात आणतात. त्यामुळे ज्या वस्तूला अगर गोष्टीला आद्यत्व व प्रथमत्वाचा मान आहे ते उद्या टिकून राहील असे निश्चितपणे सांगता येत नाही. हा अनुभव ह्या क्षेत्रातल्या विद्वान संशोधकांना नवा नाही. आतापर्यंत मराठीचा पहिला उपलब्ध कोरीव लेख म्हणून दोन तीन लेखानी मान मिळविला होता. परंतु कालांतराने हा मान फिरत्या (खेळातल्या) ढालीप्रमाणे एकाकडून दुसऱ्याकडे येत गेला आहे. अनुक्रमे हा मान १) श्रावणबेळगोळ येथील गोपटेश्वर खालील लेख शके ९०५ (शक १०३९) २) दिवे-आगरचा शके ९८२ चा ताम्रपट ३) अप्ती येथील शिलाहारांचा शके ९३४ चा (शके ११३१) मिळाला आहे.

परंतु विद्वान संशोधकांनी शिकस्त करून अर्थात खरी ती बाजू घेऊन क्र. १ व क्र. ३ ह्या लेखांचा त्रिफळा उडवून आद्यत्वाचा मान दिवेआगर ताम्रपट शके ९८२ ह्यास मिळवून दिला. वर कंसात दिलेले शकांक त्या त्या लेखांचा खरा काल आहे. ह्यावरून वाचकास कळून येईल की कालपर्यंत मराठीचा आद्य लेख म्हणून दिवेआगर ताम्रपटाकडे होता. पण आज ? आजपासून हा मान प्रस्तूतचा कुडलचा संगमेश्वर देवळातील शके ९४० च्या ह्या लेखाला मिळत आहे.

श्रावण बेळगोळचा लेख त्यात काल उल्लेख नाही म्हणून बाजूस पडला अर्थात त्यास इतरही काही तांत्रिक अडचणी उपस्थित झाल्या. अक्षीचा लेख स्पष्ट कालोल्लेखित नाही. संशयास्पद आहे. तरीही अंतर्गत पुराव्यावर तो बराच उत्तरकालीन ठरला. दिवेआगरचा लेख मात्र अगदी स्वच्छ काल उल्लेखित आहे. त्याबद्दल संशय नाही. प्रस्तूत लेख मिळाल्यामुळे त्याला आता एक नंबर खाली उतरावे लागले आहे.[४]

---

४. ह्या बाबतीत संपूर्ण हकीकत कोणा जिज्ञासूस हवी असल्यास त्यांनी खालील साधनसामग्री नजरेखालून घालावी.

(१) प्राचीन मराठी कोरीव लेख. संपा. शं. गो. तुळपुळे १९६० लेख क्र. १, २ व ४

(२) संशोधनमुक्तावलि सर ६ वा.– डॉ. मिराशी वा. वि. १९७२ 'पहिला मराठी लेख कोणता' पृ. १०६–१२१

ह्या प्रस्तूतच्या लेखामुळे ऐतिहासिक माहिती मिळत नाही हे पूर्वी सांगितलेच आहे. एकाच गोष्टीमुळे हा लेख अत्यंत महत्त्वाचा ठरतो तो म्हणजे आतापर्यंत उपलब्ध मराठी ताम्र–शिला लेखामध्ये स्पष्ट कालोल्लेखित आद्य लेख हाच ठरतो.

पाहूया हा मान या शिलालेखाकडे किती काळ टिकून राहतो तो!

वाचन[१]

(१) ओम[२] स्वस्ति[३] सकु ९४० काळयुक्त संवत्सरे [४]माङकधनुळिकाळ-छेळा.

(२) पंडित त गछतो आयाता मछ[५] ××× मि ×× छिमळनि[६] १०००

(३) वाछितो विजेयां होइवा ||~

---

१. मूळ लेखावरून व ठशा वरून

२. चिन्हाने

३. हा शब्द मला वाचता आला नाही. परंतु तो शब्द 'स्वस्ति' असा गुरुवर्य म. म. डॉ. वा. वि. मिराशी यांनी सुचविला आहे.

४. मूळलेखामध्ये येथे माह असा दिसत असला तरी प्रत्यक्षात तो 'ह' नाही तिथे 'ङ' असाच आहे.

५. फुलीच्या ठिकाणी अक्षरे फार वर वर आहेत. पण त्यांचे स्वरूप काय आहे याचा उलगडा होत नाही. त्यामुळे तिथले वाचन बिकट झाले आहे.

६. नि = निष्क – तत्कालीन प्रचलित नाणे.

पुरवणी

कुडल येथेच संगमावर संगमेश्वर देवळाला लागून पूर्व दिशेला १०।१५ फूट अंतरावर एक अतिशय सुंदर व वैशिष्ट्यपूर्ण समाधिमंदीर आहे. हे समाधी मंदीर उपेक्षित व दुर्लक्षित अवस्थेत आहे. सध्या हे मंदीर दयनीय स्थितीत आहे. ह्या मंदिरातील शिल्प व कोरीव काम अप्रतिम व प्रेक्षणीय आहे. दक्षिणेतील मंदिरांच्या शिल्पांचा अभ्यास करणाऱ्यांना ह्या मंदिराचा फार उपयोग होईल. प्राचीन मंदीर व त्यातील शिल्पांचे मला काही ज्ञान नाही म्हणून ह्या मंदिराचे यथार्थ वर्णन मी करू शकत नाही. परंतु ह्या मंदिरात दोन शिलालेख आहेत म्हणून ह्या लेखास ही पुरवणी लिहीत आहे.

ह्या मंदिराला एकमेकाशेजारी दोन गर्भगृहे आहेत. पैकी डाव्या गर्भगृहाच्या आत समोरील भिंतीवर जमिनीपासून ८।१० फूट उंचावर अंधारात दोन भागात एक कोरीव लेख आहे. मधल्या भागात हात जोडून बसलेल्या

एका साधु पुरुषाचे चित्र खोदलेले आहे. त्याच्या उजव्या डाव्या बाजूस नागरी-लिपि व कन्नड भाषेत ३।३ ओळीचा लेख आहे. लेख अंधारात व उंच जागी असल्यामुळे पूर्ण वाचन करू शकलो नाही; परंतु लेखाची सुरवात "श्री सिद्धनायर सिषराद" असा आहे. दुसऱ्या भागात 'समाधी' असा शब्द आला आहे. त्यावरून ते एकाद्या नाथपंथियाचे सिद्धपुरुष अथवा वीरशैव संप्रदायातील– जी इकडे पूर्वी प्रचलीत होती– एकाची समाधी असावी असे वाटते. लेखाचे पूर्ण वाचन पुरेशा सोईशिवाय तूर्त करणे शक्य नाही. याच मंदिराच्या एका तुळईवर तीन ओळीचा २॥ – ३ फुटाचा लेख आहे. लिपि नागरी आणि भाषा मराठी आहे. नागरी लिपीचे वळण ११।१२ व्या शतकातील लेखाप्रमाणे आहे. त्यावरून तो यादवकालीन ठरावा. लेख खडबडीत शिळेवर असल्यामुळे वाचन दुष्कर झाले आहे. पहिल्या ओळीत सुरवातीची १।२ अक्षरे लागली आहेत. ती अशी 'पंडिताचा नमस्कारु' वगैरे. ह्या पंडिताचा अद्यापि उलगडा होऊ शकला नाही.

वरील दोनही लेखात कालोल्लेख नाही. ह्याच मंदिरात बाहेरील बाजूस एका खणात तक्तपोशीवर एक अत्यंत सुंदर शिल्प शिल्पकाराने कोरले आहे. शिर एक तर धडे पांच अशा एका नर्तकीचे ते शिल्प आहे. कोणत्याही बाजूने पहा कोठल्याही धडाला ते एकच शिर प्रमाणशिर जोडल्याचा भास होईल. हे पाहून अजिंठा येथील एक लेण्यातील खांबावरील हरणाच्या शिल्पाचे स्मरण होते. ( हरणे चार तर शिर एक ). ह्या शिल्पाच्या कर्त्याचे कौतुक करावेसे वाटते. हे शिल्प अगदी रेखीव, सुबक व अत्यंत सुंदर आहे. ह्या मंदिराचे ते एक खास आकर्षण आहे. परंतु सध्यातरी दुर्लक्षित आहे. येथल्या प्रत्येक शिल्पांचा वेगळा अभ्यास करावा अशा तोडीची ही शिल्प आहेत. हे मंदीर व त्यातील शिल्पे अभ्यासकाना बुचकळ्यात टाकतील. परंतु मला राहून राहून आश्चर्य वाटते की, भीमा–सिना नद्यांच्या ह्या संगमावर असलेला ही दोन्ही मंदिरे संशोधकांच्या नजरेआड इतके दिवस कशी राहिली? बाकी हे संगमस्थान सध्याच्या मुख्य रहदारीच्या रस्त्यापासून ६/७ मैल आत आडमार्गाला आहे. आणि सध्यासुद्धा ही दोन्ही मंदिरे म्हणावी तितकी प्रसिद्ध नाहीत. अगदी निवांत आणि निर्जन ठिकाण भासावे इतक्या तुरळक प्रमाणात लोकांची ये जा असते.

तर ह्या अशा अप्रतिम समाधि-मंदीराचा व त्यांतील शिल्प कृतींचा अभ्यास व्हावयास हवा. अर्धेअधिक मंदीर सध्या निकालात निघाले आहे. उरलेले पुढील १००–१२५ वर्षांत लोक निकालात काढतील.

◆ ◆ ◆

ग्रंथ-परिचय –

## स्मृतितरङ्गम्* : एक रमणीय करुणरसप्रधान काव्य

प्रा. रा. ब. आठवले

संस्कृत साहित्याच्या अमृतमहोदधीतून निघालेली, छोटी–मोठी असंख्य काव्यरत्ने, गेली हजारो वर्षे, सहृदयांच्या रसिकमनाला रिझवीत आहेत. त्या सर्व काव्यरत्नांत 'कविकुलगुरु' कालिदासाचे 'मेघदूतम्' हे काव्य उत्कृष्ट गणले गेले आहे. आकाराने सान पण लोकोत्तर काव्यगुणाने थोर अशा या काव्याचे भाग्यही तितकेच थोर आहे. या काव्याच्या रसास्वादाने आनंदविभोर झालेल्या अनेक भारतीय पंडितांनी, संस्कृत व इतर प्रादेशिक भाषांतून त्यावर रसग्रहणात्मक व विवेचनात्मक कितीतरी टीका लिहिल्या आहेत; आणि कित्येक निर्मत्सर कवींनी त्या काव्याचे अनुकरणद्वारा कौतुक करण्याच्या बुद्धीने हंसदूत, पवनदूत, उद्धवदूत इत्यादि दूतकाव्ये लिहिली आहेत. जैनकवि जिनसेन याने 'पार्श्वाभ्युदय' या आपल्या काव्यात, मेघदूतातील प्रत्येक श्लोकातून एक किंवा दोन चरण घेऊन, त्यावर समस्यापूर्ति करणारे श्लोक लिहिले आहेत.

अनेकांनी देशी व परदेशी भाषांतून मेघदूताचा गद्यात्मक अनुवाद केला आहे. तर काहींनी त्याचा, समश्लोकी किंवा इतर विविध छंदात– पद्यात्मक अनुवाद केला आहे. शिवाय देशी भाषेत, या विरहशृंगारात्मक काव्याच्या धर्तीवर स्वतंत्र विरहकाव्ये लिहिली आहेत. 'श्रेष्ठ व्यक्तींच्या कृतींचे अनुकरण करणे हा त्या अनुकार्य व्यक्तीची केलेली 'गुणगौरवपूजा'च आहे' अशा अर्थाच्या आंग्ल सुभाषिताप्रमाणे अनुकरण करणे हा त्या अनुकार्य व्यक्तीचा बहुमानच आहे.

कविश्रेष्ठ कालिदासाच्या मेघदूताची अशीच एक वाङ्मयपूजा नुकत्याच प्रकाशित केलेल्या प्रस्तुत 'स्मृतितरङ्गम्' या संस्कृत काव्याच्या निर्मितीच्या रूपाने डॉ. मधुकर गोविंद माईणकर यांनी केली आहे. डॉ. माईणकरांनी केलेल्या या वाङ्मयपूजेत समर्पित केलेली नानापरिमलद्रव्ये अत्यंत रसिकचेतोहारी आहेत.

प्रस्तुत 'स्मृतितरङ्गम्' हे कालिदासाच्या मेघदूताचे व त्याचप्रमाणे माधवराव पटवर्धन यांच्या 'विरहतरंग' या मराठी काव्याचे, आंधळे अनुकरण

---

* स्मृतितरङ्गम् –(डॉ.) मधुकर गोविंद माईणकर, संस्कृत विभाग, मुंबई विद्यापीठ, १९७५, पृष्ठे १–३१, किंमत रु. ६.

नसून चमत्कृतिजनक व वैशिष्ट्यपूर्ण अनुकरण आहे. म्हणजे या काव्यातील मुख्य रस विप्रलंभशृंगार नसून शुद्ध करुणरस आहे. शिवाय 'मेघदूत' या काव्यात प्रारंभापासून शेवटपर्यंत अनुस्यूत असा कथानकाचा एक सूक्ष्म धागा आहे; पण स्मृतितरंगातील नायक आपल्या प्राणप्रिय पत्नीच्या निधनाने शोकाकुल होतो व त्याच्या अन्तःकरणात तिच्याशी संबद्ध असलेल्या विविध प्रसंगांच्या रम्य करुणस्मृतींचे तरंग उठतात त्यांचे रसपूर्ण वर्णन आहे. या सर्व स्मृतींची शब्दचित्रे कवीने मोत्याच्या सुटचा दाण्याप्रमाणे निरनिराळचा 'तरंगां'त रेखांकित केली आहेत. त्यामुळे 'अमरुशतका'तील प्रत्येक श्लोकाला जसे 'मुक्तक' म्हणतात तसे 'स्मृतितरंगां'तील प्रत्येक श्लोकालाही 'मुक्तक'च म्हणता येईल. यातील नायकाच्या स्मृतीला विषय झालेले व नायिकेशी संबद्ध असलेले हे सर्व प्रसंग व पदार्थ अगदी आधुनिक-अत्याधुनिक आहेत. त्यामुळे 'मेघदूता'शी त्यांची तुलना करताना, रसिक वाचकाला या काव्याचे वैचित्र्यपूर्ण वैशिष्टच क्षणोक्षणी प्रतीत होते. यातील नायिका नायकाशी बॅडमिंटनच्या क्रीडेतील स्पर्धेत पार्टनर होते, व त्याच्या क्रीडानैपुण्यामुळे त्याला सुवर्णचषकाचे पारितोषिक मिळाल्यावर त्याच्यावर अनुरक्त होते पुढे ती दोघे वडिलांच्या संमतीने विवाहबद्ध होतात. हा विवाहही अगदी वैदिक पद्धतीचा व अगदी जुन्या रूढीप्रमाणे होतो. अत्याधुनिक परिस्थितीत वाढलेल्या या जोडप्याच्या लग्नात, कंकण बांधण्याचा, घास देण्याचा, व गृहप्रवेशाचे वेळी तांदुळावर नायकाने नायिकेचे बोटाने नाव लिहिण्याची स्मृतिही आली आहे. त्यामुळे स्मृतिविषय झालेल्या यातील प्रसंगात नव्या-जुन्याचे चमत्कृतिजनक मिश्रण झाले आहे. हे सर्व नवे-जुने प्रसंग कवीने रमणीय शब्दार्थाच्या कुंचल्याने चित्रित केले आहेत.

नायकाच्या मनात उठणारे हे स्मृतितरंग कालक्रमाला अनुसरून वर्णनविषय झालेले दिसत नाहीत. म्हणजे अपेक्षित होते प्रथम नायक-नायिकेच्या विवाहपूर्व परिचयाचे वर्णन; पण या काव्यातील प्रथम 'तरंगा'त नायिकेच्या कॅन्सर रोगाने झालेल्या निधनाचे वर्णन, द्वितीय 'तरंगा'त विवाहपूर्व परिचयाचे वर्णन, तृतीय 'तरंगा'त या नवपरिणीत दांपत्याच्या काश्मीरात झालेल्या मधुचंद्राचे वर्णन– आणि सातव्या 'तरंगा'त विवाहाचे वर्णन–आणि अकराव्या तरंगात विवाहपूर्व झालेल्या बॅडमिंटनक्रीडास्पर्धेचे वर्णन! या सर्व 'तरंगां'त प्रसंगवर्णनाचा कालक्रम पाळला गेला असता तर जास्त सुश्लिष्ट रचना झाली असती. पण या कालक्रमभंगाचे समर्थन करता येणेही शक्य आहे. नायक आपल्या प्रियतमेच्या निधनाने इतका शोकविव्हल झाला की तिच्या विषयींच्या

अनुक्रमणिका

स्मृतींचे पौर्वापर्य त्याच्या ध्यानात येण्यासारखी त्याची मनःस्थितीच राहिली नव्हती. विरहव्याकुल यक्षाची व 'विक्रमोर्वशीया'तील पुरूरव्याचीही अशीच उन्मत्तावस्था झाली नव्हती का? ते दोघेही बावचळल्यासारखेच करीत नव्हते का? त्यांच्याही बोलण्यात ताळतंत्र कुठे होता?

पण ते काहीही असो. या 'स्मृतितरंगा'तील बहुधा प्रत्येक श्लोक काव्यगुणांनी मंडित असाच आहे प्रसादगुण तर ह्यातील प्रत्येक श्लोकात उत्कटत्वाने प्रतीत होतो. ह्यातील प्रत्येक श्लोकात कालिदासाच्या वैदर्भी रीतीचा आविष्कार झाला आहे. कुठेही प्रदीर्घ समास नाही, क्लिष्ट अथवा श्रवणकटु शब्द नाही, विसंष्ठुल शब्दविन्यास नाही. अर्थ समजण्याकरता डोके धरून बसावे लागत नाही; आणि सर्वावर कडी करणारी गोष्ट म्हणजे पदोपदी कालिदास, भवभूति, बाण, श्रीहर्ष यांसारख्या महाकवींच्या काव्यांतील सुरम्य पदांचा विन्यास व अर्थचमत्कृति यांचा साक्षात्कार दिसतो. याचा नमुना म्हणून खालील श्लोक पहा :

सन्ध्या जाता भवति गगनं रञ्जितं चारुवर्णैः
वासेनैते भवनवलभावासने स्थापिते द्वे ।
अत्र स्थित्वा निबिडनिचितैः स्वैः कपोलैः प्रिये सा
मन्वावाभ्यां प्रकृतिसुभगा शुक्रतारा सुदृष्टा ॥ —(तरंग १७।१)

—नायकनायिका हे प्रणयी युगल सायंकाळी गच्चीवर बसले आहे. संध्याकाळच्या विविध रंगानी रंजित आकाश वर दिसत आहे. अशावेळी शुक्राची चांदणी आकाशात चमकते आहे व तिच्याकडे गालाशी गाल लावून हे प्रेमी दांपत्य पहात आहे. किती मनोहर प्रसंग हा, अन् त्याचे वर्णन तरी किती हृद्य शब्दात कवीने केले आहे! प्रसाद तर ह्या श्लोकांत ओतप्रोत भरला आहे. यातील गालाला गाल लावून पहाणे ही कल्पना "अविरलितकपोलं जल्पतोरक्रमेण" ह्या भवभूतीच्या पंक्तीची आठवण कुणाही रसिकाला करून देईल. 'निबिडनिचितैः कपोलैः' हा बहुवचनी प्रयोग मार्मिक रसिकांना खटकल्याशिवाय राहणार नाही. फक्त ह्या श्लोकातील 'शुक्रतारा सुदृष्टा' यातील 'सुदृष्टा' पदात विनाकारण अडगळ करणारा 'सु' शब्द काढून त्याऐवजी 'प्रकृतिसुभगाऽऽलोकिता शुक्रतारा' अशासारखी रचना केली तर हा श्लोक अधिक सुंदर होईल.

आता दुसरा एक श्लोक पहा :—

जेतारं मां परमसुहृदो नर्मणा प्रोक्तवन्तः
जित्वा हैमं त्वमपि न चिरात् प्राप्स्यसे हैमकान्तिम् ।

"दुष्प्राप्या सा बहुधनवती" "निर्जिता मे गुणज्ञा।"
इत्थं चेतः कटुकमधुरैः शङ्कितैर्व्याकुलं मे ॥ —(तरंग ११।३)

—बॅडमिंटन स्पर्धेत नायकाने प्रतिपक्षाला जिंकून सुवर्णचषक मिळवल्यानंतर त्याचे मित्र त्याची थट्टा करतात : 'तू हेमचषक मिळवलास आता लौकरच तुला हेमांगी (नायिका) सुद्धा नक्की मिळणार.' इतक्यात दुसरा मित्र म्हणतो :— 'अरे ती श्रीमंताची मुलगी, तुला मिळणे कठिण आहे!' त्यावर नायक त्याला म्हणतो : 'कठिण का म्हणून? माझ्या गुणांनीच त्या गुणज्ञेला मी जिंकले आहे.' 'हेम' शब्दावर केलेली कोटी, मित्रांचे थट्टेने चिडवणे वगैरे अर्थविभूतीने व प्रसन्न रचनेने हा श्लोक फारच मनोहर झाला आहे.

खालील श्लोकातील काश्मीरातील दलसरोवराचे व त्यातील नौकागृहाचे हे वर्णन वाचा :—

यत्र क्रीडा सरसि रुचिरे स्वच्छतोये दलाख्ये
प्रेंखल्लीलालुलिततरणीगेहमध्यस्थितानाम् ।
नव्योढानां प्रकृतिमधुर. कामकेलौ रतानां
अंगग्लानिं हरति सततं मन्दमन्दः समीरः ॥ —(तरंग ३-२)

—दलसरोवरावरील नौकागृहात सुरतक्रीडा करणाऱ्या प्रेमिकाच्या श्रमाचा परिहार करणाऱ्या मृदुमंद पवनाचे हे वर्णन वाचून —

यत्र स्त्रीणां हरति सुरतग्लानिमंगानुकूलः
शिप्रावातः प्रियतम इव प्रार्थनाचाटुकारः ॥
—(पूर्वमेघ० ३२)

—ह्या मेघदूतातील सुचारु पदपंक्तीचे स्मरण कुणा रसिकाला होणार नाही? या श्लोकातील —

'प्रेंखल्लीलालुलिततरणीगेहमध्यस्थितानां'

हा दीर्घ पण सुश्लिष्टरमणीय समासही कालिदासाच्या

'प्रत्यूषेषु स्फुटितकमलामोदमैत्रीकषायः' —(पूर्वमेघ० ३२)

—ह्या दीर्घ पण अक्लिष्टमनोहर समासाची बरोबरी करील असा प्रसन्न आहे.

कुणाला असे वाटेल की या करुणरसप्रधान काव्यात शृंगाररसाचे वर्णन औचित्यभंग करीत नाही का? याचे उत्तर पूर्वीच आनंदवर्धनाचार्यांनी 'ध्वन्यालोका'त त देऊन ठेवले आहे. ध्वन्यालोक-उद्योतकारिका २०।२१ त्यांनी आपल्या उत्तराला उपोद्बलक म्हणून महाभारतातील खालील अत्यंत प्रसिद्ध श्लोक उद्धृत केला आहे :

अयं स रसनोत्कर्षी पीनस्तनविमर्दनः ।
नाभ्यूरुजघनस्पर्शी नीवीविस्रंसनः करः ।।

–या श्लोकात महाभारतात वर्णिलेल्या कौरव–पांडवयुद्धात मारल्या गेलेल्या भूरिश्रव्याच्या मृतदेहाला मांडीवर घेऊन व त्याचा हात आपल्या हातात घेऊन त्याची पत्नी करुणविलाप करीत आहे असे वर्णन आहे. ती म्हणते :

" ह्या तुमच्या हाताने रतिक्रीडा करतेवेळी माझ्या स्तनाचे मर्दन केले, माझ्या नाभि, ऊरु व जघन यांना स्पर्श केला व माझे वस्त्र फेडले ! ' ऐन करुण रसाच्या वर्णनात हे उद्दाम शृंगाराचे वर्णन रसभंग करीत नाही का ? आनंदवर्धन उत्तर देतात:– ' मुळीच नाही. उलट, यातील शृंगाराच्या वर्णनाने यथील करुणरसाचा परिपोष केला आहे. तेव्हा यातील शृंगाररसाचे वर्णन योग्यच आहे. '

पण खरं म्हणजे डॉ. माईणकरानी या काव्यात वर उदाहृत केलेल्या श्लोकातल्याप्रमाणे उत्कट शृंगाररसवर्णन कुठेच केले नाही. त्यांचे शृंगाररसवर्णन कुलस्त्रियांच्या मुग्ध शृंगाराप्रमाणे निसर्गशालीन आहे. त्यात उत्तानता कुठेही आढळत नाही.

वर वर्णिलेल्या या सर्व काव्यगुणामुळे डॉ. माईणकरांचे प्रस्तुत काव्य रसिकांना परमरमणीय वाटेल यात शंका नाही.

पण मनात विचार असा येतो की सद्य:स्थितीत, महाराष्ट्रात होत असलेली संस्कृत भाषेची व साहित्याची भयानक अनास्था व गळचेपी यांमुळे या प्रसन्न व हृद्य काव्याचा आस्वाद घेणारे रसिक पुढील पिढीत राहतील की नाही कोण जाणे ? पण याचे उत्तर भावी कालच देऊ शकेल !



अनुक्रमणिका

## ग्रंथ-समीक्षण —

समीक्षक : श्री. वा. म. कुलकर्णी

### दशरूपक-विधान

[ भरतमुनींच्या "नाट्यशास्त्रा"तील अध्याय १८ व १९ यांचे 'अभिनवभारती' "टीकेसह सटीप मराठी भाषांतर ] भाषांतरकार :– प्रा. र. पं. कंगले, प्रकाशक :– सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, सचिवालय, मुंबई– ३२ ( एकूण पृष्ठे : ७९ + ३२४, किंमत २३ रुपये)

प्रस्तुत ग्रंथात प्रा. कंगल्यांनी नाट्यशास्त्रातील १८ व १९ या दोन अध्यायांचे अभिनवभारती या टीकेसह सटीप भाषांतर केले असून त्याला ७९ पृष्ठांची विवेचक प्रस्तावना जोडली आहे. आपल्या प्रदीर्घ प्रस्तावनेत त्यानी पुढील विषयांचा परामर्श घेतला आहे. रूपक (रूप) या संज्ञेचा अर्थ (पृ. १–२) भारती, आरभटी, सात्वती व कैशिकी या चार नाट्यवृत्ती व नाटकादी दहा रूपके यांचा परस्परसंबंध ( पृ. २–३ ) नाटक, प्रकरण वगैरे रूपकांचे दहा प्रकार ( पृ. ४– १५ ) नाट्यशरीर जे इतिवृत्त (कथानक) त्याचे ५ अवस्था, ५ अर्थ प्रकृति व ५ संधींच्या संदर्भात संक्षिप्त विवेचन ( पृ. १५ ते २० ) साम, भेद वगैरे एकवीस संध्यंतरे ( पृ. २०–२१ ) लास्य म्हणजे सुकुमार नृत्त त्याची गेयपद स्थितपाठ्य वगैरे नाटकाला उपयोगी पडणारी दहा अंगे ( पृ. २१–२२ ) नाटक या सर्वश्रेष्ठ रूपक-प्रकारात योजावयाच्या राजा ( नायक ), नायिका, अन्तःपुरातील विविध व्यक्ती, सेनापति, मन्त्री वगैरे राजकुलाशी संबद्ध इतर व्यक्ती यांच्या स्वभावाचे वर्णन ( पृ. २२–२३ ), नाटकात योजावयाच्या संस्कृत व प्राकृत भाषा, तसेच गद्य आणि पद्य ( पृ. २३–२४ ), नाट्यमंडप अथवा प्रेक्षागृह (पृ २५–२६) नाट्यप्रयोगाच्या प्रारंभीचा पूर्वरंग त्याची प्रत्याहार ( वाद्ये रंगभूमीवर आणली जाणे व कलाकारानी स्वतःच्या ठरलेल्या जागी स्थानापन्न होणे), अवतरण (गायक स्थानापन्न होणे), वगैरे २० अंगे, पूर्वरंगातील नांदी या १४ व्या अंगाचे विवेचन ( पृ. २६–२८ ) नाटकाची प्रस्तावना (आमुख, स्थापना) ( पृ. २८–२९ ) ( रंगभूमीवर पात्राच्या प्रवेशाच्या प्रसंगी गायिली जाणारी ) प्रावेशिकी वगैरे पाच ध्रुवांचे गान ( पृ. २९–३० ), प्रस्तावनेत उपस्थित होणारे सूत्रधार व इतर नट ( पृ. ३०–३१ ) रसभाव यांचा आविष्कार करणारा आंगिक, वाचिक, सात्त्विक आणि आहार्य असा चार प्रकारचा अभिनय ( पृ. ३१–३५ ), नाट्यप्रयोगाचा

अनुक्रमणिका







स्थलकाल, त्याला उपस्थित राहणारा प्रेक्षकवर्ग ( पृ. ३५–३७ ), नाट्य-प्रयोगाचे प्रीति आणि व्युत्पत्ति ( मनोरंजन व बोध ) असे द्विविध प्रयोजन ( पृ. ३७–३८ ), संस्कृत नाटकाची उत्पत्ती केव्हा व कशी झाली आणि या नाट्योत्पत्तीविषयीच्या विविध विद्वानांनी मांडलेल्या मतांचा सविस्तर ऊहापोह ( ३८–७४ ) ग्रीक व संस्कृत नाट्य यांच्या मूलभूत प्रकृतीतील साम्य-भेद (पृ. ७४–७६) तसेच आपल्या उपोद्घाताच्या अखेरीस त्यांनी नाट्यशास्त्राचे मूळ पाठ व अभिनवभारती ( मुद्रित व हस्तलिखित प्रत ) जागजागी मुळातील पाठांची करावी लागणारी दुरुस्ती, अभिनवभारतीसाठी अभिनवगुप्ताने वापरलेली सोपी भाषा, आणि या व्याख्येचे स्वरूप याविषयी संक्षेपाने विवेचन केले आहे.

उपोद्घातानंतर त्यांनी नाट्यशास्त्रातील १८ व १९ या अध्यायांचा अभ्यास प्रस्तुत केला आहे. त्यात प्रथम नाट्यशास्त्राचे श्लोक, व त्यांचे भाषांतर नंतर त्यावरील अभिनवभारती टीका व त्या टीकेचे भाषांतर, नंतर पाठभेदविषयक व आवश्यक टीपा असा क्रम त्यांनी अनुसरला आहे. दशरूप-विधान अथवा ( निरूपण, लक्षण ) हा १८ वा अध्याय १४९ पृष्ठे व्यापतो आणि संधिनिरूपण ( अथवा ‘ संध्यङ्ग-विकल्प ’ ) हा १९ वा अध्याय १४९ ते ३२२ अशी १७३ पृष्ठे व्यापतो. पुरवणी टीपा ३२३–२४ ही पृष्ठे घेतात. शेवटी ३ पृष्ठांचे शुद्धिपत्र जोडले आहे.

‘ नवभारता’च्या सप्टेंबर १९७४ च्या अंकात प्रा. कंगल्यांच्या ‘ रस–भाव –विचार’ या ग्रंथाचे समीक्षण प्रस्तुत समीक्षकाने केले होते. आणि त्या समीक्षणात ‘ हा ग्रंथ लिहून प्रा. कंगले यानी मराठी शारदेच्या अंगावर एक तेजस्वी अलंकार चढवला आहे ’ असे म्हणून नाट्यशास्त्रातील इतर महत्त्वाच्या अध्यायांचे व त्यावरील अभिनवभारतीचे असेच सटीप भाषांतर प्रा. कंगल्यांच्या हातून तयार व्हावे ” अशी अपेक्षा त्यात व्यक्त केली होती. रस-भाव-विचार ह्या ग्रंथाच्या तंतोतंत धर्तीवर दशरूपक-विधान हा प्रस्तुत ग्रंथ लिहून नाट्यशास्त्रातील दश-रूपविधान आणि संधि निरूपण या नाट्यरचनेच्या दृष्टीने अत्यंत महत्वाच्या १८ व १९ या अध्यायांचे व त्यावरील अभिनवभारतीचे मराठीत सटीप भाषांतर करून त्यानी ही अपेक्षा काही अंशी पूर्ण केली आहे. हा ग्रंथ रस-भाव-विचार या ग्रंथाच्या धर्तीवर लिहिला असल्याने त्या ग्रंथाच्या शैलीविषयी, भाषेविषयी, विवेचनात्मक टीपाविषयी जे जे त्या समीक्षणात म्हटले आहे ते ते याही ग्रंथाच्या बाबतीत अक्षरशः खरे आहे. तेव्हा येथे द्विरुक्ति न करता एकदम त्यांच्या ग्रंथाकडे वळतो. आरंभी ७९ पृष्ठांचा उपोद्घात आहे. तो

अनुक्रमणिका

प्रा. कंगल्यांच्या समतोल, चिकित्सक, संशोधक वृत्तीचा निदर्शक आहे. काही ठिकाणी त्यांच्या विधानात आढळणारा अपुरेपणा अथवा त्यांच्याशी होणारा मतभेद येथे मांडावासा वाटतो.

नाटचशास्त्रावरील आपल्या पहिल्या पुस्तकाला रस-भाव-विचार हे प्रा. कंगल्यांनी दिलेले नाव सार्थ आहे. प्रस्तुत पुस्तकाला त्यानी दिलेले दशरूपकविधान हे नाव एक अर्थाने अव्याप्त आहे. कारण भरतमुनींच्या नाटचशास्त्रातील १८ व्या अध्यायाचे नाव दशरूपनिरूपण अथवा-लक्षण अथवा विधान असे आहे १९ व्या अध्यायाचे 'संधिनिरूपण अथवा संध्यङ्गविकल्प' असे नाव असून तोही अध्याय १८ व्या अध्यायाबरोबर येथे संगृहीत केला आहे. शिवाय नाटचशास्त्रात मुळात 'दशरूप' असा शब्दप्रयोग असताना दशरूपक असे नाव केवळ रूढीला* अनुसरूनच दिलेले दिसते. मात्र भरत मुनींच्या १८ व्या व १९ व्या अध्यायांचे अंतिम श्लोक लक्षात घेता दशरूपविधान हे नाव या दोन अध्यायात प्रतिपादन केलेल्या विषयाला अनुसरून सर्वथैव उचित आहे असे निःशंकपणे म्हणता येईल.

इति दशरूपविधानं सर्वं प्रोक्तं मया हि लक्षणतः । १८.११६ ( पूर्वार्ध )
दशरूपविधानं च मया प्रोक्तं द्विजोत्तमाः । ( १९.१३० ) ( पूर्वार्ध )

या संदर्भात धनंजयाच्या दशरूप ( अथवा दशरूपक ) या ग्रंथाच्या नावाचा विचार मनात येणे साहजिक आहे. नाटककारा ( कवी )ला नाटक रचताना उपयोगी पडेल अशीच सामग्री नाटचशास्त्रातून निवडून तिचा धनंजयाने या ग्रंथात संग्रह केला आहे. त्यात इतिवृत्त ( आधिकारिक व प्रासंगिक ) पाच अर्थ प्रकृति, पाच अवस्था, पाच संधी, चौसष्ट संध्यंगे, दहा रूपकाचे प्रकार हे समाविष्ट केलेच आहेत. शिवाय नायक, त्यांचे प्रकार त्यांचे विविध गुण, नायिका, त्यांचे प्रकार त्यांचे गुण हाव–विलास, अलंकार, नाटचवृत्ती,

---

* वामनाचे 'संदर्भेषु दशरूपकं श्रेयः। ( काव्यालंकारसूत्र १.३.३० ) हे प्रसिद्ध सूत्र त्यात 'रूप' शब्दाऐवजी 'रूपक' असाच शब्द योजला आहे. धनंजयाने आपल्या ग्रंथात –

'अवस्थानुकृतिर्नाटचं रूपं दृश्यतयोच्यते ।
रूपकं तत्समारोपाद् दशधैव रसाश्रयम् ॥ " ( १.७ )

– असे म्हणून नाटच, रूप व रूपक या एकार्थक शब्दातील प्रवृत्तिनिमित्त होणारा भेद दाखवला आहे. त्याचा ग्रंथ पण दशरूपक या नावानेच प्रसिद्ध आहे.

रस-भाव यांचाही संग्रह केला आहे. इतके विषय संगृहीत करून धनंजयाने आपल्या ग्रंथाला दशरूप(क)च नाव दिले आहे.

नाटककार, नाटचकृत असा शब्द भास, शूद्रक, कालिदास, भवभूति, श्रीहर्ष वगैरे संस्कृत नाटककाराना परिचित नव्हता. त्यांच्या नाटकांच्या प्रस्तावनेत नाटककार या अर्थाने 'कवि' ह्याच शब्दाचा प्रयोग पहावयाला मिळतो. अभिनवगुप्त पण 'कविः कुर्यात्तु नाटकम्' 'या नाटचशास्त्रातील (१९.१४२ व्या) श्लोकांच्या चरणावर टीका लिहिताना 'यश्च नाटकं कुर्यात् स एव कविः।' असे ठासून म्हणतात.' " नाटचस्वरूप काव्याला प्रारंभी 'रूप' अशीच संज्ञा होती. आणि 'रूपक' ही संज्ञा नंतरच्या काली प्रचारात आली' असे प्रा. कंगल्यांनी म्हटले आहे. पण 'रूपा'ला 'रूपक'का म्हटले आहे (अथवा असावे) याचा खुलासा त्यानी केला नाही. नाटच, रूप, रूपक, असे तीन वेगळे शब्द एकाच (नाटच या) अर्थी का वापरात आले याचा खुलासा दशरूपककार धनंजय यांनी पुढीलप्रमाणे केला आहे:

अवस्थानुकृतिर्नाटचं रूपं दृश्यतयोच्यते ।
रूपकं तत्समारोपाद् दशधैव रसाश्रयम् ॥ १.७

यावरील आपल्या 'अवलोक' टीकेत धनंजयांचे बंधू धनिक म्हणतात:

काव्यात वर्णन केलेल्या धीरोदात्त वगैरे अवस्थांचे अनुकरण अर्थात (आंगिक, वाचिक आहार्य व सात्त्विक) या चार प्रकारच्या अभिनयाने रामादिरूपतेचे प्रदर्शन (नटाने आपण राम असल्याचे सोंग वठवणे) म्हणजेच नाटच होय. ते 'दृश्य' असल्यामुळे त्याला 'रूप' म्हणतात. आणि जसा मुखावर चंद्राचा 'आरोप' तसा नाटचात नटावर रामादिरूपाचा 'आरोप' करण्यात येत असल्यामुळे नाटचालाच रूपक असे म्हणतात. वास्तविक 'इंद्र' ही एकच देवता परंतु त्या इन्द्र देवतेलाच 'इन्द्र,' 'पुरन्दर,' 'शक्र' अशी वेगवेगळी नावे प्रवृत्तिनिमित्तभेदामुळे जशी प्राप्त होतात तसेच हे होय.

उपोद्घातात (पृ. ४–५ वर) प्रा. कंगल्यानी रूपकप्रकारांची चर्चा केली आहे त्यात भोज राजानी आपल्या शृंगारप्रकाशात (प्रकाश ११ मध्ये) नाटक वगैरे नेहमीचे १० प्रकार आणि नाटिका व सट्टक हे दोन अधिक मिळून १२ वाक्यार्थाभिनय प्रकारांचे वर्णन करून झाल्यावर श्रीगदित वगैरे १२ पदार्थाभिनय प्रकारांचे कसे वर्णन केले आहे ते, तसेच हेमचंद्राचार्यांनी आपल्या काव्यानुशासनात आणि नाटचदर्पणकारानी आपल्या नाटचदर्पणात यासंबंधी केलेल्या वर्णनाचा उल्लेख यावयास हवा होता.

अनुक्रमणिका

काहीही असो, नाटचदर्पणकारांचे स्वतःचे हे मत कदाचित असू शकेल पण ते अभिनवगुप्ताना अभिप्रेत नाही. अभिनवभारतीतील मुद्रित पाठच मूळपाठ होता याला हेमचंद्राचार्यांच्या काव्यानुशासनातही आधार आहे :

... अप्राप्त्यंशश्चात्रावश्यंभावी अन्यथा हि संभावनात्मा प्राप्तिसंभवः कथं, निश्चय एव हि स्यात् विमर्शे त्वप्रातेरेव प्रधानता, प्राप्त्यंशस्य च न्यूनतेति विशेषः । काव्यानुशासन, पृ. ४५४

६४ संध्यंगासंबंधी प्रा. कंगल्यानी केलेल्या विवेचनात पुढील माहिती अधिक घालता येईल.

एकूण संध्यंगे चौसष्ट होत याबद्दल नाटचशास्त्र आणि त्यावर आधारित असलेल्या ग्रंथात एकवाक्यता आहे. परंतु प्रत्यक्ष त्यांचा नामनिर्देश व लक्षण करताना ६५ संध्यंगे आली आहेत. हा विरोधपरिहार करण्यासाठी विमर्श संधीतील प्ररोचना हे अथवा निर्वहणसंधीतील "प्रशस्ति" हे संध्यंग वगळून काही टीकाकार ६४ संख्या बरोबर असल्याचे दाखवतात. अभिनवगुप्ताना त्या टीकाकारांचे हे मत मान्य असावे कारण त्यांचे मत मांडल्यावर अभिनवगुप्त खंडन–मंडनात्मक असे काहीच न लिहिता मौनाचा आश्रय करतात. साहित्य-दर्पणकार गर्भसंधीतील प्रार्थना या संध्यंगाच्या प्रतिपादनाच्या शेवटी म्हणतात : इदं च प्रार्थनाख्यमङ्गम् । यन्मते निर्वहणे भूतावसरत्वात् प्रशस्ति नामाङ्गं नास्ति तन्मतानुसारेणोक्तम् ( सा. दर्पण ६. ६८ ) भोजराज मात्र प्रतिमुख-संधीतील उपन्यास हे अंग वगळून ६४ संख्या दाखवतात.

आता दशरूपकविधानातील विवेचनात्मक टीपांकडे वळले पाहिजे.

नाटचविषयक उपलब्ध ग्रंथांपैकी सर्वात प्राचीन व प्रमाण ग्रंथ म्हणजे भरतमुनींचे नाटचशास्त्र, हा ३६ अध्यायांचा आणि नाटच व तत्संबद्ध विविध विषयांचा विस्ताराने ऊहापोह करणारा विशालकाय ग्रंथ. शास्त्रीय ग्रंथ असल्याने टीकेशिवाय सुबोध होणे कठीण म्हणून त्यावर अनेक टीका लिहिण्यात आल्या. अभिनवगुप्तांच्या नाटचवेदविवृति या नावाच्या पण अभिनवभारती म्हणूनच प्रसिद्ध असलेल्या सर्वांगसुंदर व विद्वत्ताप्रचुर टीकेपुढे बाकीच्या निष्प्रभ होऊन कालाच्या उदरात गडप झाल्या. नाटचशास्त्रात दिग्दर्शक, निर्माता, नाटककार, नट याना उपयुक्त असे अनेक विषय येतात. त्यातील नाटककाराला उपयोगी पडणारा मजकूर वेचून काढून त्यांचा स्वतंत्र संग्रह काढणे क्रमप्राप्त होते. असा सर्वप्रथम प्रयत्न धनंजयांच्या दशरूपक या ग्रंथात दिसतो. तो सुबोध करण्यासाठी धनंजयांच्या धनिक या बंधूनी त्यावर अवलोक टीका लिहिली. भोजराजांच्या शृंगारप्रकाश या ग्रंथात काव्य व नाटच असे दोन्ही विषय सर्वप्रथम चर्चिले

'अभिनवगुप्ताने केलेले प्रकरणाचे हे भेद समजण्यासारखे आहेत, पण प्रकरणाचे एकंदर एकवीस प्रकार होतात असे जे त्याने म्हटले आहे ते कसे काय हे स्पष्ट नाही. फक्त नाटचदर्पणात त्याचा हिशेब भिन्न प्रकारे करून दाखविला आहे.' ( पृ. १० ) प्रा. कंगल्यांच्या ह्या विधानाचे खंडन पुढे यथावकाश करण्यात येईल.

पृ. ११ वर उल्लेख झालेल्या अमृतमन्थन समवकाराचाच पुढे 'समुद्रमंथन' पयोधिमथन' असा निर्देश झाला आहे. यथा समुद्रमथने वासुदेवादीनां लक्ष्म्यादिलाभा: दशरूपावलोक ३-६७ पूर्वार्ध; पयोधिमथने हरि-बलि-प्रभृतीनां लक्ष्म्यादिलाभाः नाटचदर्पण पृ. ११०; समवकार: यथा समुद्रमथनम् .... (साहित्यदर्पण वृत्ति ६-२४०). ईहामृग, डिम, व्यायोग, उत्सृष्टिकांक, वीथी या रूपकांच्या दुसऱ्या प्रकाराप्रमाणे समवकार प्रकाराचे तेच ते उदाहरण नाटचशास्त्रविषयक ग्रंथकारांनी व टीकाकारांनी दिले आहे यावरून हे प्रकार फारसे लोकप्रिय नव्हते म्हणून कवींनी त्यांची उपेक्षा केली व भरताच्या नंतर हे प्रकार सर्वस्वी मागे पडले असे अनुमान निघते.

संधीसंबंधी लिहिताना प्रा. कंगले म्हणतात :

"...... श्री. कवि यांनी गर्भसंधीत अप्राप्तीला प्राधान्य असते, तर अवमर्श संधीत प्राप्तीला या कारणास्तव अभिनवगुप्ताच्या व्याख्येत काही दुरुस्ती सुचवली आहे. ती अग्राह्य असल्याचे त्या ठिकाणी दाखवून दिले आहे." ( पृ. १८ )

नाटचशास्त्र १९.४१ श्लोकावरील अभिनवभारतीत शेवटचे वाक्य असे आहे : 'अवमर्शे' त्वप्राप्तेरेव प्रधानता प्राप्त्यंशस्य च न्यूनतेति विशेष: ।

या वाक्यावर श्री. कवि पादटीपेत म्हणतात :

'अवमर्शे तु प्राप्तेरेव प्रधानता, अप्राप्त्यंशस्य च न्यूनता' इति पाठ: स्यात् यत:, गर्भसन्धावप्राप्त्यंश: प्रधानं फलसंभावनात्मकत्वात् अन्यथा स फलनिश्चयात्मक एव स्यादित्युक्तं, तद्व्यतिरेकेऽवमर्शे प्राप्तेरेव प्रधानता' (नाटचशास्त्र ग्रंथक्रमांक ३, पृ. २६) पाठ दुरुस्तीची ही श्री. कवींची सूचना नाटचदर्पणातील पुढील वचनावर अधिष्ठित आहे.

"इह गर्भसन्धावप्राप्त्यंश: प्रधानं फलसम्भावनात्मकत्वात् अन्यथा फलनिश्चयात्मक एव स्यात् । अवमर्शसन्धौ तु प्राप्त्यंश: प्रधानं फलनिश्चयरूपत्वादिति विशेष: ।" पृ. ४९

प्रस्तुत पाठ बरोबर आहे की नाही याची शंका वाटते कारण "अवमर्श" संधीच्या वृत्तीत अभिनवगुप्ताना नाटचदर्पणकार अनुसरत असल्याचे दिसते. ते

गेले आहेत. तो आदर्श दृष्टिसमोर ठेवून हेमचंद्राचार्यांनी काव्यानुशासन हा ग्रंथ तयार केला. त्यांनी दशरूपकात आलेले महत्त्वाचे विषय नाटचशास्त्रातून घेतले व त्यावरील विवेक या आपल्या टीकेत अभिनवभारतीचे उतारेच्या उतारे समाविष्ट केले. दशरूपक हा ग्रंथ सुटसुटीत असल्याने फारच लोकप्रिय झाला. ह्या ग्रंथाशी स्पर्धा करू शकणारा नाटचदर्पण नावाचा एक सुरेख ग्रंथ रामचंद्र व गुणचंद्र या हेमचंद्राचार्यांच्या शिष्यांनी लिहिला. दोन्ही ग्रंथात विषय सामान्यत: सारखेच आहेत. नाटचदर्पणकारांनी अभिनवभारतीचा पुष्कळच उपयोग केला आहे. अंबाप्रसादच्या कल्पलताविवेकात नाटचशास्त्रातील थोडासा भाग आला असून त्यावर अभिनवभारतीतील संबंधित भाग टीकारूपाने उद्धृत केला आहे. हे सर्व येथे लिहिण्याचे प्रयोजन असे की नाटचशास्त्रातील ६ व्या व ७ व्या रस व भावविषयक अध्यायांचे तसेच १८ व्या व १९ व्या दशरूपविधान व संधिनिरूपण या अध्यायांचे व त्यावरील अभिनवभारतीचे भाषांतर करणाऱ्या अभ्यासकाने या वर निर्दिष्ट केलेल्या ग्रंथांचा भ्रष्ट पाठ दुरुस्त करण्याच्या कामी व अर्थ निर्णय करण्यासाठी सर्वतोपरि उपयोग करणे अपेक्षित ठरते. असा अपेक्षित उपयोग करून घेतल्याचे प्रस्तुत ग्रंथावरून दिसून येत नाही असे खेदाने म्हणावे लागते. ग्रंथकारांनी काव्यानुशासनातील आठव्या अध्यायाचा आणि नाटचदर्पणाचा उपयोग केला असता तर त्यांना अनेक ठिकाणी मूळपाठ निश्चित करणे सहज शक्य झाले असते हे पुढील काही उदाहरणावरून सुस्पष्ट होईल.

त्याबरोबरच काही ठिकाणी संदर्भावरून स्वत:च्या प्रतिभेच्या बळावर प्रा. कंगल्यांनी सुचवलेल्या पाठदुरुस्त्या ह्या योग्य अशाच आहेत आणि त्यांना वर निर्दिष्ट केलेल्या ग्रंथात आधार सापडतो ही गोष्ट प्रा. कंगल्यांना खासच भूषणावह आहे असे मुक्तकंठाने मान्य केले पाहिजे. अशा काही महत्त्वाच्या पाठदुरुस्त्या, त्यांची योग्यायोग्यता याचा विचार करणे ओघानेच येते.

१. तथा प्रख्यातत्वेऽपि देवचरितं स्वप्रभावादिबहुलतयोपदेशायायोग्यम् ... राजान ऋषय इवेत्युपमितसमासः न च सर्वथा देवचरितं तथावर्णनीयम् किन्तु दिव्यानामाश्रयत्वेन नागानन्दे भगवत्याः पूर्णकरुणानिर्भरायाः साक्षात्करणे ... प्रत्युत देवानामधियाधानं प्रसिद्धिविघातकम् । पृ. २२.

या परिच्छेदावरील टीपेत प्रा. कंगले लिहितात. 'स्वप्रभावादि-मुद्रित पाठ 'वरप्रभावादि' असा आहे. तो विशेष समर्पक नाही' (पृ. २३) तथापि काव्यानुशासनातही वरप्रभावादि (पृ. ४३५ पं. ९) असाच पाठ आहे. तेव्हा तो पाठच स्वीकारणे उचित होईल.

काव्यानुशासनात ‘उपमित-समासः’ ऐवजी ‘उपमिति-समासः’ (पृ ४३३ पं ११– ११) असा पाठ आहे. तथापि हा पाठभेद नगण्य होय. ‘तथावर्णनीयम्’ ह्या पदाची फोड ‘तत्र न वर्णनीयम’ (पृ. ४३३ पं–११–१२) अशी हेमचंद्राचार्यांनी केली आहे. पूर्ण करुणाभरनिर्भरायाः या पाठाऐवजी पूर्ण-करुणाभर-निर्भरायाः (पृ. ४३३ पं. १३) असा काव्यानुशासनातील पाठ आहे.

‘दिव्यानामाश्रयत्वेनोपायत्वेन’ (पृ. ४३३ पं. १२) असा पाठ काव्यानुशासनात आहे. ‘आश्रयत्वेन’ म्हणजेच ‘उपायत्वाने’ आणि पताका, प्रकरी हे अर्थाचे (साध्याचे, मुख्यफलाचे) उपायच असल्याने हा अर्थ संदर्भाला फार अनुकूल आहे.

‘देवानामधियाधानम्’ याचा अर्थ स्पष्ट नाही. कारण पाठ शुद्ध आहे असे निश्चित म्हणता येत नाही. ‘अधिया’ हे ‘अधी’ शब्दाचे तृतीयेचे रूप मानता येईल व अ-धी म्हणजे बुद्धीचा अभाव असा अर्थ करता येईल पण तो सर्वथा असमाधानकारक आहे. विप्रलम्भादीचा आवेश हे काही बुद्धीच्या अभावाचे लक्षण नाही. कदाचित् ‘अधीरताधानम्’ असा मूळ पाठ असावा’– पृ. २४ प्रा. कंगल्यांच्या प्रमाणे इतरानाही हा पाठ दुर्बोध वाटला आहे. उदाहरणार्थ, प्रा. पटवर्धन व डॉ. मॅसन ‘प्रत्युत देवानामधियाधानं प्रसिद्धि-विघातकम्’ या वाक्याचे पुढीलप्रमाणे भाषांतर करतात :

‘If on the contrary, the (genuine) doings of Gods are presented unwittingly (adhiyā–ādhānam) that would offend what is generally well-known (in the world as possible in the case of human beings)’

तथापि, We are not certain of the phrase’ असे ते प्रांजळपणे नमूद करतात. तसेच या परिच्छेदातील एका वाक्याबद्दल ते म्हणतात.

Also, we are not able to understand the exact sense of the last sentence :

नायिका तु दिव्याप्यविरोधिनी, यथोर्वशी नायकचरितेनैव तद्वृत्तस्याक्षेपात् ।

प्रस्तुत वाक्याचा अर्थ नाटचदर्पणातील पुढील वाक्यावरून स्पष्ट होतो: देवतानां तु दुरुपपादस्याप्यर्थेच्छामात्रत एव सिद्धिरिति तच्चरितमशक्यानुष्ठान-त्वात् न मर्त्यानामुपदेशयोग्यम्, तेन ये दिव्यमपि नेतारं मन्यन्ते, न ते सम्य-गमंसतेति । नायिका तु दिव्यापि भवति यथोर्वशी, प्रधाने मर्त्यचरिते तच्चरि-तान्तर्भावात् ।

'देवानामधियाधानाम्' हे शब्द असलेले वाक्य काव्यानुशासनात अथवा नाट्यदर्पणात घेतले नसल्यामुळे मूळ पाठ काय असावा याबद्दल अंदाज करणेच काय ते शक्य आहे. अभिनवगुप्तांच्या मते विप्रलंभ, करुण, अद्भुत, भयानक यासारख्या रसांच्या योगाने कथानकात वैचित्र्य येते आणि ते आल्हादक होते विप्रलंभादी रस रंजकतेत प्राण ओततात. देवांच्या विषयी बोलायचे झाले तर त्याना दुःख काय ते ठाऊक नसते. तेव्हा देवचरित नाटकाचा विषय म्हणून घेतला तर प्रेक्षकांचा हृदयसंवाद ( तन्मयता, तल्लीनता ) होणे कठीण आहे. देवचरित विषय घेऊन त्यात विप्रलंभादी रसांची योजना केली तर ते देवचरित न राहता माणसाचेच चरित होईल. इतकेच नव्हे तर, उलट देवांच्या बाबतीत ते दुःखी असल्याचे दाखवणे हे सर्वस्वी (लोक–) प्रसिद्धीच्या विरुद्ध होईल आणि ( लोक– ) प्रसिद्धीचा भंग झाल्यास प्रतीतीत विघ्न उत्पन्न होईल, मग रसास्वादाची काय कथा ? ( प्रसिद्धिखण्डनेन प्रतीतिविघातात् का कथा रसचर्वणायाः अ. भा. १८. १० ) दुसऱ्या ठिकाणीही ( ना. शा. अ. ९. २२–२३ वरील अभिनवभारती ) दिव्यांच्या–देवांच्या ठिकाणी दिव्य प्रभाव, ऐश्वर्य असल्यामुळे अत्यंत दुर्लभ वस्तुसुद्धा त्याना केवळ इच्छेने प्राप्त होतात असे अभिनवगुप्तानी म्हटले आहे. या सर्व गोष्टी विचारात घेता येथील पाठ 'देवानामाध्यभिधानं' अथवा 'देवानामाध्याधानं' असा असावा असे वाटते. आधि ( व्याधीच्या विरुद्ध ) म्हणजे मानसिक दुःख 'देवाना मानसिक दुःख असते' असे म्हणणे अथवा 'देवांच्या ठिकाणी मानसिक दुःख लादणे' असा या सूचित पाठांचा अर्थ होईल. कदाचित अभिनवभारतीचे एकादे हस्तलिखित नव्याने मिळाले तर ह्या पाठापैकी एखादा अथवा अशाच अर्थाचा पाठ त्यात मिळेल असे प्रस्तुत समीक्षकास वाटते.

२. '( रंजनाया ) एतत्प्रामाणत्वात् ही मुळातील 'एतत्प्रमाणत्वात्'ची केलेली दुरुस्ती आहे, 'प्रमाण'ला प्रस्तुत संदर्भात काही अर्थ नाही.' पृ. २४.

ही दुरुस्ती सर्वस्वी योग्यच आहे. येथे नमूद करणे इष्ट होईल की–

'Some corrections And Emendations to the Text of the Abhinavabhāratī' या नावाने Adyar Library Bulletin मध्ये प्रसिद्ध केलेल्या लेखात डॉ. राघवन् यानी हीच दुरुस्ती सुचवली होती. 'रंजनाया एतत्प्रमाणत्वात् should read रंजनाया एतत्प्राणत्वात् ।'– Vol. XVIII, part 3–4, p. 208, Serial No. 34.

३. 'प्रसिद्धित्रययुक्तमपि वस्तु न निष्फलं व्युत्पत्तये भवति इत्यत आह.' न निष्फलं या मुद्रित पाठाची प्रा. कंगल्यानी 'न सफलं' अशी दुरुस्ती केली आहे. दुरुस्तीचे कारण ते पुढीलप्रमाणे देतात : 'केवळ प्रसिद्धींनी युक्त असे कथानक असले की त्यापासून बोध प्राप्त होतोच असे नाही हा अर्थ अभिप्रेत असल्यामुळे ही दुरुस्ती आवश्यक आहे हे उघड आहे' (पृ. २५) हे प्रा. कंगल्यांचे म्हणणे पटत नाही. तीन प्रकारच्या प्रसिद्धींनी युक्त असलेले कथानक सुद्धा धर्म, अर्थ, काम व मोक्ष यापैकी एका अथवा अनेक फलांनी युक्त नसेल तर विनेयाना– सुकुमारमति नृपति अथवा प्रेक्षक याना बोध देत नाही असे अभिनवगुप्ताना म्हणावयाचे आहे हे 'नानाविभूतिभिर्युतं धर्मार्थकाममोक्ष-विभवैः फलभूतैर्विचित्ररूपैर्युक्तम् ।' या लगेच पुढे आलेल्या टीपेवरून स्पष्ट दिसून येते. तेव्हा पाठ दुरुस्तीची आवश्यकता नाही तसेच, मूळ पाठ 'न निष्फलं' असाच होता असे ठासून म्हणावयाला हेमचंद्राचार्यांच्या काव्यानुशासनाचा आधार आहे. 'प्रसिद्धमपि वस्तु न निष्फलं व्युत्पत्तये भवतीत्यत आह– नानाविभूतिभिर्युतम् धर्मार्थकाम-मोक्ष-विभवैः फलभूतैर्विचित्ररूपैर्युक्तम् । पृ. ४३३, हा सर्व परिच्छेद इतर अनेक परिच्छेदाप्रमाणे अभिनवभारतीवरच बहुतांशी आधारित आहे. 'राज्यादि– समृद्धिः' ऐवजी 'राज्यादेः संपत्तिः' असे काव्यानुशासनातील शब्द आहेत. अर्थात काही फरक नाही. तेन राज्ञा सर्वं राज्यं ब्राह्मणेभ्यो दत्त्वा वानप्रस्थं गृहीतव्यम् इत्येवं प्रायं फलं नोपनिबन्धनीयम्' या वाक्यातील अधोरेखित शब्दाऐवजी 'गृहीतम्' 'नोपनिबन्धव्यं धर्ममोक्ष-बहुलम्' असे शब्द काव्यानुशासनात आहेत.

४. 'हस्तलिखितात 'फलमपि दृष्टसुखार्थं हीति बाहुल्येन ।' असा पाठ आहे. मुद्रित पाठ 'तत्फलमपि दृष्टसुखार्थी हि लोको बाहुल्येन ।' असा आहे. त्यात 'फलम्'चा अन्वय लागत नाही. 'ह्या कारणास्तव प्रा. कंगल्यानी 'फलमपि हि दृष्टसुखार्थबाहुल्येन । अशी पाठात दुरुस्ती केली आहे. हेमचंद्राचार्यांचा मात्र प्रस्तुत संदर्भात 'दृष्टसुखार्थी हि बाहुल्येन लोकः । असा पाठ आहे. नाट्य-दर्पणकारही 'साक्षाद्दृष्ट-फलार्थी हि लोकः । (पृ. २५) असेच म्हणतात.

गणैरिति अप्रधानभूतानि चेष्टितानि हेयानि प्रतिनायकगतानि अपाय-प्रधानानि तैर्युक्तम् या वाक्यातील 'अपायप्रधानानि' ऐवजी काव्यानुशासना-तील अपनय-प्रधानानि हा पाठ सरस आहे. तसेच 'चाणक्य परिचय वेदन मात्र फलम्' या मुद्रित पाठाऐवजी हेमचंद्राचार्यांचा चाणक्य परिचयावेदन असा पाठ आहे तो अधिक ग्राह्य वाटतो कारण याच परिच्छेदात खाली ...... चेष्टितानाम् आवेदकाः प्रवेशकाः 'या टीपेत' आवेदक हा आवेदन या शब्दाशी निकटचे नाते असलेला शब्द आलेला आहे.

५. 'वस्त्वधिकं' मुद्रितपाठ 'वस्त्वादिकं' असा आहे. पुढील अध्यायाच्या पहिल्या श्लोकात इतिवृत्त म्हणजे कथानक हे नाटयाचे शरीर असे म्हटले आहे. तदनुरोधाने शरीर म्हणजे ( फल ह्या अर्थी ) वस्तु अधिक इतिवृत्ताचे इतर अंश असे येथे म्हटलेले असावे. ( पृ. ७३ )

ही दुरुस्ती आणि तिचे समर्थन उघड न पटणारे आहे. मुद्रित पाठ 'वस्त्वादिकं' हाच मूळ पाठ होय. तो समर्पक व संदर्भानुकूल असून हेमचंद्राचार्यांच्या काव्यानुशासनात तोच पाठ आढळतो. भरतानी वर्णिलेल्या नाटकादि दहा रूपकप्रकारांचे व नाटिकेचे विवरण करताना काव्यानुशासनात अभिनवभारतीतील उतारेच्या उतारे उद्धृत केले आहेत. 'यत्र कविरात्मशक्त्या' इत्यादि आर्यावरील अभिनवगुप्तांची उपलब्ध टीका त्रुटित आहे. त्यातील गहाळ झालेला भाग हेमचंद्राचार्यांनी आपल्या विवेकात संपूर्ण उतरून घेतलेल्या मूळ अभिनवभारतीच्या उताऱ्यात सुरक्षित आहे असे अभ्यासांती प्रस्तुत समीक्षकाचे मत झाले आहे.

'अथास्य सप्तविधस्यापि प्रकरणस्य प्रत्येकं भेदत्रयं दर्शयितुमार्यात्रयं पठति सचिवेत्यादी' असे पुढे अभिनवभारतीत म्हटले आहे. तेव्हा हे प्रकरणाचे सात भेद पूर्वीच ( या यत्र कविरात्मशक्त्या' इत्यादि आर्येवरील टीकेत ) अभिनवगुप्तानी सांगितले असले पाहिजेत असा वाचकाचा ग्रह होतो. अभिनवभारतीतील उपलब्ध टीकेची व हेमचंद्राचार्यांच्या विवेकातील उद्धृत टीकेची पुढील तुलना या दृष्टीने उद्बोधक आहे :

| अभिनवभारती | काव्यानुशासन ( विवेक ) |
|---|---|
| यत्र कविरात्मशक्त्येति । वस्त्विति साध्य फलम् , शरीरमिति तदुपायं वस्त्वादिकं काव्याभिधेयम्, आत्मशक्त्या प्रकुरुते काव्येन तत्प्रकरणमिति बुधैर्ज्ञेयमिति संबन्धः । | आत्मशक्त्येति इतिहासादिप्रसिद्धं निरस्यति । वस्त्विति साध्यं फलम् । शरीरमिति तदुपायम् । [ नायकमिति साधयितारम् । चकारः सर्वसमुच्चये । द्वितीयस्त्वसमग्रसमुच्चये । एवकारः समुच्चया भावे । उत्पत्तौ भवमौत्पत्तिकं निर्मितम् । तदयमर्थः–त्रितयमपि यत्र कविकृतं द्वयमेकं च । अन्यत्तु पूर्वोपनिबद्धं तत् सर्वं प्रकरणं भेदसप्रकमयम् । ] वस्त्वादिकं काव्याभिधेयमात्मशक्त्या प्रकुरुते यत्र काव्ये तत् प्रकरणमिति बुधैर्ज्ञेयमिति संबन्धः । |

या तुलनेवरून दिसून येईल की कंसात दाखवलेला भाग उपलब्ध अभिनवभारतीत नाही. हेमचंद्राचार्यांनी तो स्वतःच्या पदरचा घातला आहे असे म्हणणे शक्य असले तरी त्यांची ग्रंथलेखनशैली, अभिनवगुप्तांच्या अभिनवभारती व लोचन टीकेविषयीचा त्यांचा आदरातिशय व या टीकाग्रंथातून त्यांनी उद्धृत केलेले लहान मोठे उतारे विचारात घेता हा भागही त्यांनी मूळ अभिनवभारतीतून उद्धृत केला असावा असे मानणे अधिक सयुक्तिक आहे.

'वस्त्वादिकं' हा मुद्रित पाठच समर्पक व मूळपाठ असला पाहिजे असे म्हणण्याचे कारण काव्याचे ( प्रस्तुत ठिकाणी प्रकरणाचे ) अभिधेय-वस्तु, शरीर व नायक ही तीन 'यत्र कविरात्मशक्त्या' इत्यादि आर्येत भरतांनी सांगितली आहेत. 'वस्त्वादिकम्' मधील 'आदि'ने उरलेले दोन शरीर व नायक अभिप्रेत आहेत.

तसेच 'यत्काव्येन' या मुद्रित पाठापेक्षा हेमचंद्राचार्यांचा 'यत्र काव्ये' हा पाठ अन्वयार्थाला अधिक अनुकूल आहे.

६. 'यत्र समुत्पाद्यं न भवति तत्र योऽनुत्पाद्योंऽशः स कुत्रस्थो ग्राह्य इति दर्शयितुमाह यदनार्षमित्यादि समुद्रदत्तचेष्टितादि ननु तत्रांशे ... तत् यदि. अवस्तुभूतै .. गुणैर्युक्तं प्रकरोति, तदिति तस्माद्धेतोरेतदपि प्रकरणम्–" पृष्ठ ७३.

काव्यानुशासनात हा अभिनवभारतीतील परिच्छेद उद्धृत केला आहे. तेथे अधोरेखित शब्दाऐवजी पुढील पाठ आढळतात :

यत्र न सर्वमुत्पाद्यं भवति ... स कुत्रस्थो ... समुद्रदत्ततच्चेष्टितादि । ननु च ... तद् यदिति यस्मादभूतैः ... – पृ. ४३४–४३५

"यत्र न सर्वमुत्पाद्यं भवति" हा पाठ अन्वयार्थाला फार अनुकूल आहे. मुद्रित 'न कुत्रस्थो' पाठाऐवजी प्रा. कंगल्यांनी 'स कुत्रस्थो' असा दुरुस्त केलेला पाठ योग्यच आहे आणि तो मूळ तसा होता याला काव्यानुशासनातील पाठाने पुस्तीच मिळते.

"समुद्रदत्तचेष्टितादि" या मुद्रित पाठाऐवजी काव्यानुशासनात – 'तच्चेष्टितादि' असा पाठ मिळतो. तथापि पुढेही "समुद्रदत्तचेष्टितादिवर्णने" असा पाठ अभिनवभारतीत व काव्यानुशासनातही आढळत असल्याने व अर्थाच्या दृष्टीने फारसा फरक होत नसल्याने या पाठाची अधिक चर्चा करण्याचे कारण नाही.

"ननु च" असा मुद्रित पाठ आहे. प्रा. कंगले लिहितात. मुळात "ननु" नंतर "च" अधिक आहे. परंतु तो निरर्थक असल्याकारणाने गाळला आहे." तथापि मुद्रित पाठालाच काव्यानुशासनाचा दुजोरा मिळतो.

अनुक्रमणिका

"यदिति वस्तुभूतैः' असा मुद्रित पाठ आहे. 'यदि अवस्तुभूतैः' अशी प्रा. कंगल्यांनी दुरुस्ती केली आहे. आर्येतील "अभूतगुणयुक्तम्" ची व्याख्या येथे असल्यामुळे नञर्थवाचक "अ" अवश्य आहे हे उघड आहे" असे या दुरुस्तीचे त्यांनी कारण दिले आहे. मूळ आर्येत "यद्" 'तद्" अशी पदे आहेत. "यदि" "तद्" अशी नाहीत. तेव्हा काव्यानुशासनातील यदिति यस्मादभूतैः– तदिति तस्माद्धेतोः हाच अभिनवभारतीतील मूळ पाठ असणे अधिक संभवनीय आहे. अर्थात प्रा. कंगल्यांच्या दुरुस्त पाठाने अर्थ नीट लागतो. काव्यानुशासनाचा पाठ मूळ आर्येला धरून आहे व अभिनवगुप्तांच्या टीकेतील इतर भागाशी सर्वस्वी जुळणारा आहे तेव्हा तोच अधिक स्वीकार्य होय.

७ नानाविभूतियुक्तमृद्धिविलासादिभिः इत्यादिनायक फलवत्वमुक्तं तद्वस्तु– पृ. ७४.

मुद्रित प्रतीतही ( ना. शा. १८. ४८, पृ. ४३०.) असाच पाठ आहे. फक्त 'तत्, वस्तुशरीरमिति' 'अशी चुकीची जुळणी आहे. तथापि अधोरेखित पाठाऐवजी काव्यानुशासनात 'इत्यादिना यत फलवत्वमुक्तं तद् वस्तु" असा पाठ आढळतो तो वाक्यातील "यत्" तत् या उचित योजनेमुळे अर्थातच ग्राह्य होय.

८. प्रख्यातोदात्तेति प्रसक्तं निषेधति नोदात्तेति तन्निषेधे चार्थान्नाटके वैपरि ( ? री) त्यमायातम् यदतिदेशाद् देवानां प्रयोज्यत्वं प्रसक्तं . .नाटके देवानामिव इहापि राज्ञः प्रवेशे शक्यमाने निराकरोति न राजसंभोग इति । . . . . अतएव राजनियम उचितोऽन्तःपुरजनः प्रवेशकादौ कार्य इत्यर्थः पृ. ७६.

मुद्रित आवृत्तीत थोड्याशा फरकाने अधोरेखित पाठच आहेत. फरक असणारे पाठ असे आहेत : यद्नादेशाद् देवानां, राज्ञः प्रवेशे शंकमाने, अतएव राजनियमः उचितोऽन्तःपुरजनः . . . . . . ना. शा. १८. ४८–४९ पृ. ४३१

विवेचक टीपेत यातील काही पाठांची चर्चा आहे.

'प्रवेशे शंक्यमाने' मुद्रितात 'शंकमाने' आहे पण कर्मणि धातुसाधित विशेषण आवश्यक आहे हे उघड आहे. हस्तलिखितात 'प्रवेशोऽङ्कमानो' असा भ्रष्ट पाठ आहे. 'राजनियम उचितः' पहिला शब्द सप्तमी एकवचनात आहे. त्यातील नियम शब्द विशेष समर्पक नाही. प्रासाद अथवा परिवार या अर्थाचा शब्द अधिक समुचित झाला असता.' पृ. ७७.

मुद्रित आवृत्तीतील अधोरेखित पाठ समर्पक नाहीत हे खरे, प्रा० कंगल्यांनी सुचवलेल्या दुरुस्त्या पण समर्पक वा समाधानकारक नाहीत हेही तितकेच खरे. हेमचंद्राचार्यांच्या काव्यानुशासनात मात्र मूळ पाठ सुरक्षित असल्याचे आढळते : तन्निषेधे चार्थान्नाटकवैपरीत्यमायाताम् । नाटके देवनामि-

वेहापि राज्ञः प्रवेशं शंकमानो निराकरोति न राजसंभोग इति । ... अत एव राजनि य उचितोऽन्तःपुरजनः तद्व्यतिरिक्तो बाह्यजनोऽत्र चेटदासादिः प्रवेश-कादौ कार्य इत्यर्थः । पृ. ४३५-४३६.

हेमचंद्राचार्यांचे पाठ इतके संदर्भानुकूल, समर्पक व अर्थपूर्ण आहेत की ते अभिनवभारतीतील मूळ पाठच असले पाहिजेत या विषयी चर्चा करण्याचीही आवश्यकता वाटत नाही.

९. अ) एतदेवाभिमन्यमानेन पुष्पदूषितके ... प्रकरणे हि तादृश एव नायकः केवलमन्यवणिगपेक्षया स उत्तमोऽस्तु व्युत्पाद्यश्च तत्रैवंविध एव ... पृ ७७.

प्रस्तुत परिच्छेदातील काही मुद्रित पाठ बदलून दुरुस्त केलेले आहेत. हे पाठ दुरुस्त करण्याची कारणे प्रा. कंगल्यांनी टीपेत ( पृ. ७८ ) दिली आहेत. टीकाकार ब्रह्म यशःस्वामीविषयीचा संदर्भ वगळून व दुसरे थोडे बदल करून हा सर्व परिच्छेद नाट्यदर्पणकारांनी पुढीलप्रमाणे उद्धृत केला आहे. तो अन्वयार्थाला एकदम सरळ आहे. तो उतारा या पाठचर्चेच्या शेवटी उद्धृत करीत आहे.

आ ) ' वेणीसंहार नाटकाच्या दुसऱ्या अंकात दुर्योधन आपल्या पत्नीच्या चारित्र्याविषयी साशंक होतो. ते जसे त्याच्या बाबतीत अनुचित नाही, तसे ते पुष्पदूषितकाच्या नायकाच्या बाबतीतही नाही असा भावार्थ " ( पृ. ७९ ).

हा भावार्थ अगदी विपरीत आहे. अभिनवगुप्तांचा अभिप्राय पुढील प्रमाणे आहे. उत्तम प्रकृती ( स्वभावा ) च्या राजे लोकांनी स्वतःच्या कुलीन पत्नीच्या शीलाच्या बाबतीत संशय घेणे हे अगदी अनुचित होय. वेणीसंहार नाटकाच्या दुसऱ्या अंकात राजा दुर्योधन स्वतःच्या पत्नीच्या चारित्र्याविषयी मिथ्या संशय घेतो. देवी भानुमतीच्या शीलाविषयी खोटा संशय घेणे हे राजा दुर्योधनाला मुळीच शोभत नाही. या उलट, ( पुष्पदूषितक प्रकरणात ) नायक समुद्रदत्त हा स्वतःच्या पत्नीच्या नन्दयतीच्या चारित्र्याच्या बाबतीत खोटाच संशय घेतो. असा संशय घेणे त्याच्या बाबतीत योग्य आहे. कारण तो उत्तम-प्रकृति राजा नाही, तर वणिक् व्यापारी आहे. प्रकरणात तसाच नायक असतो. दुसऱ्या वणिकाच्या-व्यापाऱ्याच्या-मानाने तो उत्तम असतो एवढेच. हाच अभिनवगुप्तांचा अभिप्राय आहे असे म्हणण्याला नाट्यदर्पणातील पुढील उताऱ्याची पुष्टी मिळते.

...अत एवात्र नायिकौचित्येन नायकोऽपि मन्दगोत्र एव । एवं च पुष्पदूषितकेऽशोकदत्तादिशब्दाकर्णनेन समुद्रदत्तस्य नन्दयन्त्यां या व्यलीकशंकोप-

निबद्धा, सा न दोषाय। परपुरुषसंभावनाया निर्वहणं यावदत्रोपयोगित्वात्। अपरथोत्तमप्रकृतीनां श्वशुरेण वध्वाः पुत्रे दूरस्थिते निर्वासनं, निर्वासितायाश्च शबरसेनापतिगृहेऽवस्थानमनुचितमेव । उत्तमप्रकृतीनां राज्ञां तु कुलस्त्रियां व्यलीकसंभावना दुर्योधनस्येव भानुमत्यामनुचितैव । वणिगमात्यविप्राश्च स्ववर्गापेक्षयैवोत्तमाः, न राजापेक्षया। एतदर्थमेव च मन्दशब्देन गोत्रं विशेषितम्। प्रकरणे हि नायको व्युत्पाद्यश्च मध्यमप्रकृतिरेव । नाटयदर्पण, पृ, १०३.

१०. (अ) 'सप्तविधस्य' वस्तुतः सात प्रकारच्या प्रकरणांचा आतापर्यंत कोठेच उल्लेख नाही. चाळिसाव्या आर्येचा उपक्षेप करताना तीन भेदांचा निर्देश आहे असे म्हटले आहे. (प्रकरणस्य सभेदस्य लक्षणम्) परंतु प्रत्यक्ष आर्येत त्यांचा निर्देश नाही, इतकेच नव्हे तर तिच्यावरील टीकेतही तो नाही. असा संभव दिसतो की त्रेचाळीसाव्या आर्येत निर्देशिलेले विप्र आदी नायकांच्या अनुरोधाने हे भेद कल्पिले आहेत. तथापि त्या ठिकाणी सहाच जणांचा उल्लेख केला आहे. येथील टीकेवरून असे दिसते की सातव्या प्रकारचा नायक विट हा मानला आहे. आणि ह्या सात प्रकारच्या नायकामुळे प्रकरणाचे सात प्रकार होतात असे अभिनवगुप्ताचे मत दिसते.'– (पृ. ८०).

(आ) 'एकविंशति' ही संख्या कशी काय सिद्ध होते ते स्पष्ट नाही. विट धरून सात प्रकारचे नायक असलेले सात प्रकार मान्य केले तरी त्या प्रत्येकाचे तीन तीन प्रकार होतात असे जे प्रारंभी विधान केले आहे त्याला पुढील विवेचनात पुष्टी मिळत नाही. श्रेष्ठी, सचिव आदि नायक असलेल्या सहा प्रकारांचे दोन शुद्ध भेद होतात एक कुलस्त्री नायिका असलेले व दुसरे वेश्या नायिका असलेले असे म्हटले आहे. म्हणजे हे बारा प्रकार मानता येतील. विट नायक असल्यास फक्त संकीर्ण म्हणजे एकच प्रकार संभवतो असे स्पष्ट म्हटले आहे. म्हणजे एकूण तेराच भेद संभवतात, एकवीस नाही. नाटयदर्पणात नायक, फल आणि वस्तु हे तीन एकेकटे, दोन दोन किंवा तिन्ही काल्पनिक असता सात भेद व नंतर कुलजा, वेश्या किंवा दोन्ही यांच्या या सात भेदातील संभाव्य योजनेमुळे एकवीस प्रकार होत असल्याचे म्हटले आहे. अभिनवभारतीत ते अभिप्रेत नाहीत.' (पृ. ८१).

वरील दोन्ही परिच्छेदातील विवेचन बरोबर आहे असे बेसावध वाचकाला वाटेल. परंतु अभिनवगुप्ताना अनुसरणारे हेमचंद्राचार्य व नाटयदर्पणकार यांच्या ग्रंथातील प्रकरण विषयक भागाचा अभ्यास केल्यास अभिनवभारतीला अभिप्रेत असलेले प्रकरणाचे एकवीस भेद हेमचंद्राचार्य व नाटयदर्पणकारानी दाखविले असल्याचे दिसून येते. कसे ते पहा :

'यत्र कविरात्मशक्त्या' या आर्येत भरत स्वच्छच म्हणतात की जेव्हा कवी आपल्या प्रतिभेने ( १ ) वस्तु ( २ ) शरीर व ( ३ ) नायक यांची स्वतंत्रपणे निर्मिती करतो तेव्हा ते प्रकरण होय.

या आर्येवरील टीकेच्या आरंभी 'तत्र प्रकरणस्य सभेदस्य ( ? सप्तभेदस्य ) लक्षणं नाम निर्वचनं चाह' असे अभिनवगुप्त म्हणतात. उपलब्ध टीकेत ( १ ) वस्तु व ( २ ) शरीर ह्या दोनच शब्दांचा अर्थ केल्याचे दिसते. ( ३ ) नायक याचा अर्थ केल्याचे दिसत नाही. कदाचित त्या शब्दाच्या अर्थाची फोड करण्याची अभिनवगुप्ताना आवश्यकता वाटली नसावी अथवा टीकेतील तेवढा अंश गहाळ झाला असावा. काही असो, अभिनवगुप्ताना अनुसरणाऱ्या हेमचंद्राचार्यांच्या काव्यानुशासनातील पुढील उतारा आपल्या अभ्यासाच्या दृष्टीने अतिशय उपयुक्त आहे.

आत्मशक्त्येति। इतिहासादिप्रसिद्धिं निरस्यति। वस्त्विति। साध्यं फलम्। शरीरमिति। तदुपायम्। नायकमिति साधयितारम्। चकारः सर्वसमुच्चये द्वितीयस्त्वसमग्रसमुच्चये। एवकारः समुच्चयाभावे। उत्पत्तौभवमौत्पत्तिकं निर्मितम्।

तदयमर्थः। त्रितयमपि यत्र कविकृतं द्वयं एकं च। अन्यत्तु पूर्वोपनिबद्धं तत् सर्वं प्रकरणं भेदसप्तकमयम्। वस्त्वादिकं काव्याभिधेयमात्मशक्त्या प्रकुरुते यत्र काव्ये तत् प्रकरणमिति बुधैर्ज्ञेयमिति संबन्धः। काव्यानुशासन पृ. ४३४ पं. १७ २३.

भरताच्या मूळ आर्येतील दोघा 'च'कारांचा व एका 'एव' काराचा हेमचंद्राचार्यांनी काढून दाखविलेला अर्थ त्यांचे ( किंवा हा भाग मूळ अभिनव-भारतीतील असेल पण आता उपलब्ध प्रतीत तो गहाळ झाला असेल तर अभिनवगुप्तांचे ) टीकाशास्त्रातील नैपुण्य व पांडित्य दाखवतो. वस्तु, शरीर व नायक हे तिन्ही काल्पनिक असता ( १ ) या तिन्हीपैकी दोन काल्पनिक असता (२) आणि या तिन्हीपैकी एक एक काल्पनिक असेल तर (३) असे प्रकरणाचे एकूण सात भेद होतात.

असेच प्रकरणाचे सात भेद नाट्यदर्पणकारानीही दिले आहेत. फक्त वस्तु, शरीर, नायक असे भरतांचे शब्द न वापरता इन ( नायक ) फल ( मुख्य साध्य ) व वस्तु ( फलसाधक उपाय ) हे शब्द वापरून हे सात भेद करून दाखविले आहेत. इनो नायकः। फलं मुख्य साध्यम्। वस्तु फलसाधका उपायाः। एतेषामेक–द्वि-त्रि-विधानेन सप्तभेद प्रकरणम् (नाट्यदर्पण पृ. १०४)

या सात भेदापैकी प्रत्येकाचे पुनः तीन भेद होतात असे 'सचिवे' त्यादि तीन आर्यावर टीका लिहिताना अभिनवगुप्त म्हणतात. या तिन्ही आर्यांचा व त्यावरील अभिनवगुप्तांच्या टीकेचा बारकाईने अभ्यास केल्यास असे दिसून येईल की गृहस्थधर्माला अनुरूप पुरुषार्थ साध्य करणाऱ्या कथावस्तूत वेश्या नायिका असू नये तर (१) कुलस्त्री असावी, गृहस्थधर्माला अनुरूप पुरुषार्थ साध्य करणारी कथावस्तु नसल्यास (२) वेश्या नायिका असावी आणि विट हा नायक असेल तर (३) वेश्या आणि कुलस्त्री या दोघींचीही योजना करावी. अशा तीन प्रकारच्या नायिकांच्या योजनेनुसार प्रकरणाचे २१ भेद होतात.

११. "देवी चंद्रगुप्त" या निर्देशात काहीतरी गोंधळ असावासे वाटते ह्या नावावरून हे स्पष्ट होते की ह्या रूपकाचा नायक चंद्रगुप्त म्हणजे एक राजा असणार. तेव्हा हा रूपकप्रकार नाटक होय, प्रकरण नव्हे. विशेषतः विट नायक असलेल्या प्रकरणाचा विचार चालू असता ह्या नाटकातील उदाहरण अनुचित ठरेल. पुढील वाक्यात माधव व वसंत सेना ही ह्या रूपकातील दोन पात्रांची नावे दिली आहेत. ती विट व वेश्या यांची असण्याची शक्यता आहे. तसे असल्यास हे उदाहरण एका प्रकरणातून घेतले आहे असे म्हणता येईल. पण त्याचे नाव देवीचद्रगुप्त असणे शक्य नाही त्या नाटकात विट व वेश्या यांची योजना असण्याचाही संभव फारसा नाही. तेव्हा हे नाव येथे चुकीने पडले आहेसे दिसते.' (पृ. ८१)

प्रा. कंगल्यांचा हा तर्क निराधार आहे. देवीचन्द्रगुप्त हे विशाखदेवाचे नाटक (सामान्य अर्थाने, वास्तविक प्रकरण) अनुपलब्ध असल्यामुळे कुणाचाही गैरसमज व गोंधळ होणे स्वाभाविक आहे. तथापि विशाखदत्ताच्या (विशाख-देवाच्या) देवीचंद्रगुप्त या प्रकरणातील ७ उतारे नाट्यदर्पणात (पृ. ६२, ७५, ७६, १०४, १२४, १७२, १७३) आढळतात व ४ उतारे भोजाच्या शृंगारप्रकाशात (पृ. ५००, ५०१, ५०२, ५०३) आढळतात. नाट्यदर्पणकार अभिनवभारतीतील संदर्भित उताराच (पण शुद्ध स्वरूपात) पृ. १०४ वर उद्धृत करतात. तेव्हा अभिनवगुप्त व नाट्यदर्पणकार यानी प्रकरणाच्या संदर्भात हा उतारा उद्धृत केला असल्याने देवीचन्द्रगुप्त हे प्रकरणच होते असे निर्विवाद म्हणता येते. तसेच अभिनवभारतीतील 'तथा च देवीचन्द्र-गुप्ते वसन्तसेनामुद्दिश्य माधवस्योक्तिः–' 'या उत्थानिकेऐवजी' यथा विशाख-देवकृते देवीचन्द्रगुप्ते माधवसेनामुद्दिश्य कुमारचन्द्रगुप्तस्य उक्तिः – 'अशी उत्थानिका आढळते. मृच्छकटिक प्रकरणातील वसन्तसेनेप्रमाणे या ठिकाणची माधवसेना ही वेश्याच आहे.

१२. ‘परंतु जेथे वेश्या आदींचा संबंध असतो व जे अतिभडक व उच्छृंखल वगैरे असते ते ... संकीर्ण प्रहसन’ पृ. ११८.

‘अकल्प म्हणजे नियंत्रण नसलेले, उच्छृंखल ... संकीर्णात पात्रांच्या अनिबंध वागणुकीमुळे ते ( हास्य ) उत्पन्न होते.’ पृ. ११९.

अभिनवगुप्तांचे मूळ वाक्य असे आहे :

यत्र तु वेश्यादिभिर्योगोऽत्युल्बणं चाकल्पादि तदेकद्वारेणानेकवेश्यादि-चरितेन हसनीयेन संकीर्णत्वात् संकीर्णम् । पृ. ११७.

संस्कृत भाषेतील संधीमुळे मोठमोठ्या पंडितांची अनेकदा फसगत होते. प्रस्तुत चाकल्पादि पदाने प्रा. कंगल्यांना चांगलेच चकवले आहे. त्यांनी च + अकल्प ( + आदि ) असा संधि सोडवून अकल्प म्हणजे नियंत्रण नसलेले उच्छृंखल असा अर्थ केला आहे. या ठिकाणी च + आकल्प ( + आदि ) असा संधि व आकल्प म्हणजे वेष असा अर्थ घेणे अभिनवगुप्ताना अभिप्रेत आहे. कारण मूळ नाट्यशास्त्रात ‘अनिभृतवेषपरिच्छदचेष्टितकरणैस्तु’ असा पाठ असून त्यातील अनिभृतवेषाचे स्पष्टीकरण करताना त्यानी ‘अत्युल्बणं चाकल्पादि’ असे म्हटले आहे. नाट्यदर्पणकारही ‘अनिभृतवेषां’ ऐवजी ‘उद्धताकल्पा’ असे शब्द वापरून ‘अत्युल्बणवेष’ असा त्याचा अर्थ करतात (पृ. ११३,२,२०)

१३. ‘एवं दम्भोऽपि’ ही मुळातील ‘एव भावि’ ह्या भ्रष्ट पाठाची केलेली दुरुस्ती आहे. दुरुस्त पाठच आवश्यक आहे व त्याचेच भ्रष्ट रूप हस्तलिखितात उत्पन्न झाले आहे हे उघड आहे.’ – पृ. १२०.

प्रा. कंगल्यांनी केलेली ही दुरुस्ती योग्यच होय. नाट्यदर्पणकारांचा पण या दुरुस्तीला आधार मिळतो :

यथा शाक्यानां स्त्रीसंपर्को गर्हणीयो न चौर्यम् एवं दम्भोऽपि । –पृ. ११३.

१४. “एकमुखेनैव न भाण्यन्ते उक्तिमन्तः क्रियन्ते अप्रविष्टा अपि पात्रविशेषा यत्रेति भाणः ।” – पृ. १२१.

काव्यानुशासनात मात्र ‘भण्यन्ते’ असा पाठ आहे. ( पृ. १४२ )

१५. ‘परसंबन्धि वचनं’ ही मुळातील ‘परसन्धिवचनं’ची दुरुस्ती आहे. प्रस्तुत ठिकाणी ’ सन्धि ‘ शब्दाने अर्थबोध होण्यासारखा नाही.’ – पृ. १२३.

प्रा. कंगल्यांनी केलेली ही दुरुस्ती योग्यच आहे. ह्या दुरुस्तीला हेमचंद्राचार्यांचा पण आधार आहे.

परवचनमिति । परसंबन्धि वचनम् । – पृ. ४४१.

१६. ‘स प्रयोज्यः’, मुद्रितात ‘संप्रयोज्यः’ आहे. तो पाठ मूळ नाही’ – पृ. १२३.





'स प्रयोज्यः' असाच पाठ हेमचन्द्राचार्यांचा आहे. काव्यानुशासनः
—पृ. ४४३.

१७. 'उदाहरणमात्रमेतत्' याचा असा अर्थ होतो की वीथीची याहूनही अधिक अंगे असू शकतात. पण तसे इतरत्र कोठे सूचन नाही. पुढील आर्येवरील टीकेत उदाहृत म्हणजे प्रतिवचन असा अर्थ केला आहे. 'उदाहरण' शब्दाचा येथे तोच अर्थ अभिप्रेत असण्याचा संभव आहे. —पृ. १३१.

प्रा. कंगल्यांच्या या विधानाशी सहमत होणे कठीण आहे. वीथीची तेराहून अधिक अंगे असू शकतात असे हेमचंद्राचार्यांनी स्पष्ट म्हटले आहे. ... तदुपरि चाङ्गैस्त्रयोदशभिर्युक्ता 'तथा' शब्दादुक्तप्रकारव्यतिरिक्त वक्रोक्त्यन्तरसहस्रसंकुलापीत्यर्थः। —काव्यानुशासन, पृ. ४४३.

१८ यदा प्रष्टैव प्रतिवचनगतं वैचित्र्यमभिसंधाय पृच्छति प्रतिवक्त्रु-चितमभिधत्ते तदा तदुत्तरमुद्घात्यकम्। —पृ. १३२.

यावरील टीपेत प्रा. कंगले लिहितात :

'प्रतिवक्त्रुचितम्' मुळात 'प्रतिवक्तोचितम्' असे आहे पण प्रतिवक्ता असे प्रथमान्तरूप संभाव्य नाही. वाक्यात प्रष्टा हा कर्ता अगोदरच निर्दिष्ट झाला आहे. आणि प्रतिवक्तृ आणि उचित यांचा समास येथे आवश्यक आहे. —पृ. १३३.

नाट्यदर्पणकार अभिनवभारतीतील वरील 'उद्घात्यक' संबंधीचा उतारा थोड्याशा फेरफारासह पुढीलप्रमाणे देतात :

'यदा प्रष्टा विवक्षितोत्तरदानसमर्थः किन्तु यन्ममाभिप्रेतं तद् युक्तायुक्तं वेत्यभिसंधाय पृच्छति प्रतिवक्ता चोचितमभिधत्ते तदौद्घात्यम् इत्यर्थः। पृ. १३२. नाट्यदर्पणकारांच्या मते अभिनवगुप्ताना 'उद्घात्यका' मध्ये प्रष्टा (प्रश्न विचारणारा) व प्रतिवक्ता (उत्तर देणारा) हे दोघेही अभिप्रेत आहेत. 'प्रतिवक्ता चोचितमभिधत्ते' या नाट्यदर्पणकारांच्या वाक्यावरून त्यांच्यापुढे अभिनवभारतीतील प्रतिवक्तोचितमभिधत्ते' हेच वाक्य होते असे सहज अनुमान निघते. तेव्हा 'प्रतिवक्त्रुचितम्' असा पाठ दुरुस्त करणे योग्य वाटत नाही.

१९. 'वितारण' हा शब्द 'प्रतारण' या अर्थी वापरला आहे, पण किंचित सौम्य अर्थाने.' —पृ. १३७.

हे म्हणणे इतकेसे पटणारे नाही. नाट्यदर्पणकार तर 'परविप्रतारणकारि' (पृ. १२९) असेच म्हणतात

'प्रतारण' ह्या अर्थी वितारण असा शब्द रूढ नाही तो 'प्रतारण या अर्थी वापरला आहे, पण किंचित सौम्य अर्थाने' असे प्रा. कंगले कशाच्या आधारे म्हणतात ते कळत नाही.

२०. 'व्यसनिना राजपुत्रेण मन्त्रिपुत्रेण किं सुखमिति पृष्टेनोत्तरं दीयते।'
—पृ. १३८.

'मन्त्रिपुत्रेण' हा शब्द हस्तलिखितात आहे. मुद्रितात नाही. मूळ पाठ 'मन्त्रिणा' असाच असण्याचा दाट संभव आहे. मंत्र्याला असा प्रश्न विचारण्याचा अधिक संभव आहे. मंत्रिपुत्राला नाही. 'राजपुत्रेण' 'शब्दातील पुत्रेण' शब्दाची पुढील शब्दात चुकीने द्विरुक्ती झालेली दिसते. 'पृष्टेन'च्या ऐवजी मुद्रितात 'पृष्टे तेन' असे आहे. पण 'तेन' म्हणजे कोणी याचा त्यात उलगडा होण्यासारखा नाही. येथे शब्द पुढेमागे झालेले दिसतात.

'राजपुत्रेण किं सुखमिति पृष्टेन मंत्रिणोत्तरं दीयते' असाच मूळ पाठ असावा.—पृ. १३९.

मूळ— प्रस्तुत वाक्य (व उदाहरण) नाटचदर्पणात आले आहे:

यथा वा— व्यसनिना राजपुत्रेण किं सुखमिति पृष्टे मंत्रिपुत्रेणोच्यते—

नाटचदर्पणकारांचा हा पाठ अन्वयार्थाच्या दृष्टीने सरळ व सुगम आहे. ह्या पाठामुळे वरील टीपेतील तर्कावर आधारलेला भाग केवळ कल्पनाविलास ठरतो.

२१. "सुसङ्गते, कथमहमिहस्थो भवत्या ज्ञातः इति राजन्युक्तवति सुसंगतयोच्यतेण केवलं भट्टा, चित्तफलहेण, ता देवीए णिवेदइस्सं।"
पृ. १३९.

"सुसंगते मी येथे आहे हे तुम्हाला कळले का? असे पहिल्या वाक्याचे भाषांतर प्रा. कंगल्यांनी केले आहे. खरे म्हणजे "आम्ही (शब्दशः, मी) येथे आहोत हे, सुसंगते तुला कसे कळले?" असे भाषांतर हवे.

सुसंगतेचे प्राकृत भाषेतील मुद्रित उत्तर अपूर्ण आहे. मूळ उत्तर असे आहे; "भट्टा न केवलं तुकं चित्तफलएण सव्वो वुत्तंतो मए जाणिदो, ता गदुअ (पा. भे. गडुय) देवीए निवेदइस्सं।

(भर्तः, न केवलं त्वम्, समं चित्रफलकं न सर्वो वृत्तान्तो मया ज्ञातः। तद्गत्वा देव्यै निवेदयिष्यामि।) नाटचदर्पण, पृ. १२३.

२२. यत्रोक्तिप्रत्युक्तिक्रमे क्रियमाणे परस्परप्रज्ञानोपजीवनबलात् स्वपक्ष-सुघटितता, तद्बलसंबधादधिबलम्। —पृ. १४१.

यावर प्रा.— कंगले पुढील टीप देतात:

"सुघटितता तद्बल'— हा हस्तलिखितातील पाठ आहे. मुद्रित पाठ— "सुघटितादधिबलम्' असा आहे. स्वपक्षाला सुघटितता येते म्हणजे त्या पक्षाला बळकटी येते. तो दृढ होतो, आणि तो असा बलवान होतो म्हणून

ह्या प्रक्रियेचे नाव अधिबल असे अभिनवगुप्ताला म्हणावयाचे आहे. त्यासाठी हस्तलिखिताचा पाठ अधिक समर्पक आहे. अधिबलसंबंध सुघटित होतो असे म्हटले असण्याची शक्यता कमी. " पृ. – १४२.

'अधिबल' का म्हटले, मूळ पाठ काय असावा यासंबंधीचे हे विवेचन तितकेसे सयुक्तिक वाटत नाही. नाटचदर्पणकारांनी हा उतारा अभिनवभारतीतून घेतला आहे. त्यांच्या पाठात 'अधिबल' या संज्ञेचे जे निर्वचन आले आहे ते तर्काला पटणारे असेच आहे.

मिथः परस्परं जल्पे उक्ति–प्रत्युक्तिक्रमे क्रियमाणे स्वपक्षस्य स्वाम्युपगमस्य परस्परप्रज्ञोपजीवनबलाद् स्थापना सुघटितत्वं क्रियते यत्र, तदधिकबलसंबन्धादधिबलम् । पृ. ११९.

२३. अधमप्रकृतेस्तु न नायकत्वमिति ब्रुवन् प्रहसनभाणकादौ किं ब्रूयात् हास्यादिरसप्रधानत्वे अधम एव नायकः । – पृ. १४७.

यावर टीप लिहिताना प्रा. कंगले म्हणतात :

'ब्रुवन्' ही मुळातील 'ध्रुवं' ची केलेली दुरुस्ती आहे. 'ध्रुवम्' ने काहीच अर्थ लागण्यासारखा नाही.' – पृ. १४८.

'कनिष्ठ प्रतीचे पात्र नायक होणार नाही' असे ज्याचे म्हणणे होते त्याचा अभिनवगुप्तानी नावाने निर्देश केलेला नाही. परंतु नाटचदर्पणकारांच्या यासंबंधीच्या उल्लेखावरून ते मत शंकुकाचे होते असे कळून येते.

प्रा. कंगल्यानी 'ध्रुवम्' ची 'ब्रुवन्' अशी केलेली दुरुस्ती योग्यच आहे असे नाटचदर्पणकारानी समानार्थक 'प्रतिपादयन्' असे पद वापरले आहे. त्यावरून म्हणता येते. शंकुकस्त्वधमप्रकृतेर्नायकत्वमनिच्छन् प्रहसन– भाणादौ हास्यरसप्रधाने विटादेर्नायकत्वं प्रतिपादयन् कथमुपादेयः स्यादिति ।

नाटचदर्पण, – पृ. ११७.

२४. 'रामादिनाऽर्थक्रियामारभमाणो' ही सुचवलेली दुरुस्ती आहे. हस्तलिखितात 'रामादिनोऽर्थ'– असे आहे. पण 'रामादिनः' असे रूप अशक्य आहे. 'रामादिना' ह्या तृतीयेनंतर 'उद्युक्तः' 'प्रेरित.' असा शब्द अध्याहृत धरता येण्यासारखा आहे. मुद्रितपाठ 'रामादिनोपक्रियमाणे' असे आहे. त्यात 'उपक्रियमाणे' हे 'प्रसिद्धिप्राशस्त्ये' चे विशेषण होते. पण ही कल्पना संभवनीय वाटत नाही आणि प्रधानाने उपकार करण्याचा प्रश्न उपस्थित होत नसल्यामुळे हा मूळ पाठ असण्याची शक्यता कमी. 'प्रभवमानो' ही मुळातील 'प्रभवमाने' ची दुरुस्ती आहे. हे 'सुग्रीवबिभीषणप्रभृतिः' चे विशेषण आहे, 'प्रसिद्धि-प्राशस्त्ये' चे नाही." पृ १८४.

प्रस्तुत पंक्ति नाट्यदर्पणकारानी मूळ अभिनवभारतीमधून थोड्याफार फरकाने उद्धृत केली आहे ती अशी :

सुग्रीवबिभीषणादिर्हि रामादिनोपक्रियमाणो रामादेरात्मनश्चोपकाराय ( प्र ) भवन् रामादेः प्रसिद्धि प्राशस्त्यं च संपादयति ।

'रामादिनोपक्रियमाणे' आणि 'भवन्' अथवा 'प्रभवन्' अथवा 'प्रभवमानो' असेच पाठ योग्य होत. प्रधानाने उपकार करण्याचा प्रश्न उपस्थित होत नसल्यामुळे हा पाठ ( रामादिनोपक्रियमाणे ( ? णो ) मूळ असण्याची शक्यता कमी' असे प्रा. कंगले म्हणतात ते संयुक्तिक वाटत नाही. उदाहरणार्थ, प्रधान नायक राम वालीचा वध करून सुग्रीवाला तारा ही त्याची पत्नी व किष्किंधेचे राज्य मिळवून देतो आणि अशा रीतीने त्याच्यावर उपकार करतो आणि मग सुग्रीव सीतेचा शोध लावण्यापासून रामाच्या हातून रावणाचा वध होऊन सीतेची पुनःप्राप्ति होईपर्यंत त्याला साहाय्य करतो.

२५. 'एक उपाय चिन्तिला असता अकस्मात दुसऱ्या उपायाच्या प्राप्तीचे उदाहरण नागानन्द नाटकात जीमूतवाहनाला शंखचूडापासून प्राप्त व्हावयाच्या वध्य मनुष्याच्या वस्त्राऐवजी कंचुकीचे केलेले दोन वस्त्रांचे अर्पण.' ( पृ. १९७ )

'शङ्खचूडप्राप्यवध्यपटस्य' यावर टीप लिहिताना ग्रंथकार म्हणतात : 'ह्या समासात मुळातील' 'प्राप्त'च्या ऐवजी प्राप्य शब्द वापरून दुरुस्ती केली आहे.' ( पृ. १९८. )

ही दुरुस्ती चिन्त्य आहे. अभिनवभारतीचा मुद्रित पाठ 'शङ्खचूडाप्राप्त वध्यपटस्य' ( अ. १९–३१, पृ. २० ) असा आहे. व्याकरणदृष्टया तो सदोष आहे. नाट्यदर्पणकारानी अभिनवभारतीतून नागानन्दातील उदाहरणाचा हा भाग जशाचा तसा उद्धृत करून मूळ पाठ सुरक्षित ठेवला आहे.

अन्यस्मिन्नुपाये जिन्तिते सहसोपायान्तरप्राप्तिर्यथा नागानन्दे जीमूतवाहनस्य शङ्खचूडादप्राप्तवध्यपटस्य कंचुकिना वासोयुगलार्पणमिति । ( नाट्यदर्पण, पृ. ४० ) शङ्खचूडादप्राप्त ० हा पाठ ग्रंथकारांनी सुचवलेल्या पाठापेक्षा एकदम समुचित आहे. कारण तो नागानन्दाच्या कथावस्तूशी सुसंवादी आहे. प्रस्तुत प्रसंग संक्षेपाने नाटकलक्षणरत्नकोशात असा दिला आहे : यथा जीमूतवाहनस्य परार्थे आत्मानं ददतः शङ्खचूडेन न दत्तं वध्यचिह्नम् तद्व्याकुलस्य कंचुकिनानीय मित्रावसुजनन्या प्रहितं रक्तवासोयुगं दत्तम् । यथा वासोयुगमित्यादि ( नागानन्द ४–२१ ) पृ. ४३. पं. १०१०–१०१३.

अनुक्रमणिका

२६. 'आणि 'मुख' शब्दाचा अर्थ कथानकात ज्याचे कार्यसिद्ध होते तो नायक असा केला आहे. स्वतंत्र हे नायकाचे विशेषण.' पृ. २०५.

'मुखा' चा अर्थ नायक म्हणायचा म्हणजे कल्पनेची अगदी हद्द झाली. वास्तविक 'मुख' हा अपपाठ असून 'मुख्य' हा मूळ पाठ असला पाहिजे हे नाटयदर्पणातील पुढील अवतरणावरून कळून येईल.

सन्धयो मुख्यवृतांशा .. ... १. ३७.

मुख्यस्य स्वतन्त्रस्य महावाक्यार्थस्यांशा भागाः परस्परं स्वरूपेण चाङ्गैः सन्धीयन्त इति सन्धयः ... ... । पृ. ४८.

२७. 'अमात्यस्य वीरः' हा वीररस कर्तव्यपालनरूप धर्मवीर असावा. 'शृङ्गाराद्भुतो' ह्या अंकात उदयनाच्या वासवदत्ताविषयक प्रेमाचा आविष्कार आहे. आणि त्याची मदनाच्या स्वरूपात पूजा केली जाते यात अद्भुत रस मानलेला दिसतो.' – पृ. २०७.

प्रा. कंगल्यांचे हे प्रतिपादन इतकेसे रमणीय नाही. अभिनवभारतीतील या संदिग्ध पंक्तीवरील नाटयदर्पणकारांचे पुढे उद्धृत केलेले प्रसन्न भाष्य अर्थाचा निश्चय करायला फार उपयोगी आहे.

प्रारम्भोपयोगी यावानर्थराशिः प्रसक्तानुप्रसक्त्या विचित्ररससन्निवेशस्तावान् मुखसन्धिरित्यर्थः । यथा रत्नावल्यां प्रथमोऽङ्कः । अत्र हि सागरिका राजदर्शनरूपे अमात्यप्रारम्भविषयीकृतेऽर्थराशौ अमात्यौगन्धरायणस्य पृथ्वीसाम्राज्यविजिगीषोर्वीरः, वत्सराजस्य वसन्तविभावः शृङ्गारः, पौरप्रमोदावलोकनादद्भुतः, तत उद्यानगमनादारभ्य पुनः शृङ्गार इति ।

२८. ... ... यत्रोद्घाटनं सर्वत्रैव कथाभागसमूहे तत्प्रतिमुखम् ।

प्रतिराभिमुख्येन यतोऽत्रवृतिः । पृ २०८.

'प्रति म्हणजे आभिमुख्याने अस्तित्व असते' ( पृ. २०९ ) असे वरील वाक्याचे भाषांतर प्रा. कंगल्यानी केले आहे.

प्रतिमुखाची व्युत्पत्ति अधिक स्पष्टपणे हेमचंद्राचार्यांनी पुढीलप्रमाणे दिली आहे :

... ... स प्रतिमुखम् । प्रतिराभिमुख्ये । मुखस्याभिमुख्येन यतोऽत्र वृत्तिः । – काव्यानुशासन, पृ. ४५१.

कदाचित् अभिनवभारतीतील उपलब्ध आवृत्तीत शब्दसादृश्यामळे 'मुख्ये मुखस्याभि' ही अक्षरे लेखकाच्या दोषामुळे गहाळ झाली असावीत.

नाटयदर्पणातही मुखस्याभिमुख्येन वर्तत इति प्रतिमुखम् । – ना. द. पृ. ४८ अशी सरळ व्युत्पत्ती दिली आहे.

२९. प्राप्तिरप्राप्तिरन्वेषणमित्येवंभूताभिरवस्थाभिः पुनः पुनर्युक्तो गर्भसन्धिः। – पृ. २१०

'–पुनःपुनर्युक्तो' मुद्रितात 'युक्तो'च्या पूर्वी 'भवन्तीभिः' शब्द अधिक आहे. पण तो आवश्यक आहे असे नाही.' –पृ. २११.

प्रा. कंगल्यांचे हे विधान विचारणीय आहे. प्रश्न आहे तो मुद्रितातील 'भवन्तीभिः' हा पाठ मूळचा आहे का नाही? तो 'अधिक' आहे अथवा आवश्यक आहे असे नाही असे म्हणणे मूळ प्रश्नाला बगल देण्यासारखे आहे. 'भवन्तीभिः' हा पाठ अभिनवभारतीत मूळात असावा, नव्हे होता असे म्हणावयाला नाट्यदर्पणात आधार आहे. नाट्यदर्पणकार नाट्यशास्त्रातील गर्भसंधीचे लक्षण आपल्या पद्धतीने पुढीलप्रमाणे देतात :

बीजस्यौन्मुख्यवान् गर्भः लाभालाभगवेषणैः।

आणि वृत्तीत स्पष्टीकरण करताना लिहितात :

. . . लाभालाभगवेषणैः पुनः पुनर्भवद्भिर्युक्तः प्रधानवृत्तांशो गर्भसन्धिः।

– पृ. ४९.

अभिनवभारतीत पुढे 'अवस्थाभिः' असे स्त्रीलिंगी तृतीया बहुवचनी रूप असल्याने 'भवन्तीभिः' अशा त्यापूर्वी आलेल्या विशेषणाचे नाट्यदर्पण-कारानी 'भवद्भिः' असे 'लाभालाभगवेषणैः' या रूपाशी जुळणारे रूप वापरले आहे पण याहून बिनतोड पुरावा हेमचंद्राचार्यांच्या काव्यानुशासनात आढळतो. त्यानी अभिनवभारतीतील मूळ वाक्य जसेच्या तसे उतरून घेतले आहे :

प्राप्तिरप्राप्तिरन्वेषणमित्येवंभूताभिरवस्थाभिः पुनः पुनर्भवन्तीभिर्युक्तो गर्भसन्धिः प्राप्तिसंभवाख्ययावस्थया युक्तत्वेन फलस्य गर्भाभावात्।

– काव्यानुशासन पृ. ४५२.

३०. ... मुद्रितात 'विदूरकारणसंपातात्मकत्वं' असे आहे. पण 'संपात' पेक्षा संपादक अधिक उपपन्न आहे.' – पृ. २१६.

ग्रंथकाराच्या या विधानाला आव्हान देणारी 'संपात' शब्दयोजना (अभिनवभारतीच्या प्रभावाने लिहिलेल्या) विमर्श संधीवरील आपल्या वृत्तीत नाट्यदर्पणकारानी केली आहे :

....साध्यं प्रधानफलं तद्-विघ्नात्मा प्रत्यूहहेतुसंपातात्मा . . प्रधान-वृत्तांशः विमृशति बलवदन्तरायहेतुसंपातप्रत्यासन्नमपि साध्यं प्रतिसन्दोग्धि नेताऽस्मिन्निति विमर्शः। 'श्रेयांसि बहुविघ्नानि भवन्ति' इति विघ्नहेतुसंपातेऽपि प्रत्यासन्नवर्तिनि फले न निवर्तनीयमिति व्युत्पादयितुमवश्यमत्र सन्धौ विघ्नहेतवो निबन्धनीयाः। – नाट्यदर्पण, पृ. ५०.

नाट्यदर्पणातील या उताऱ्यावरून मुद्रितातील विदूरकारण ( ? विघ्न-कारण= विघ्नहेतु ) संपातात्मकत्वं हाच मूळ पाठ होता असे ठामपणे म्हणता येते.

३१. ...नानाविधैः सुखदुःखात्मकैः हासशोकक्रोधादिभिर्भावैः – पृ. २१९.

याच निर्वहणसंधीच्या टीकेत पुढे अभिनवगुप्त स्वतःच लिहितात :

'यदा च सुखप्राप्तेः फलवत्वं तदा इतिहासादिबाहुल्यं प्रारम्भादीनाम् । दुःखहानेस्तु फलत्वे क्रोधशोकादिदुःखात्मकभावबाहुल्यं स्वोचितव्यभिचारिसहितं द्रष्टव्यम् ।' – पृ. २२०.

तेव्हा प्रारंभीच्या वर उद्धृत केलेल्या वाक्यात पण रतिहासशोकक्रोधा-दिभिर्भावैः असाच पाठ होता आणि उपलब्ध प्रतीत 'रति' ही अक्षरे गहाळ झाली आहेत असे अनुमान निघते. या अनुमानाला अभिनवभारतीतील प्रस्तुत भाग उद्धृत करताना 'सुखदुःखात्मके रतिहासशोकक्रोधादिभिर्भावैः. (पृ. ४५५) असाच पाठ स्वीकारून हेमचंद्राचार्य जोरदार पुष्टि देतात.

३२. 'अमून् सर्वान् इ.' ह्या वाक्याचा अर्थ स्पष्ट नाही. शब्दशः अर्थ असा होतो की, पाचही अवस्था परिपूर्ण होत असता ( निर्वहण म्हणजे निवाहं, तडीस नेणे याअर्थी ) प्रत्येक अवस्थेत हे पाच संधी होतात. म्हणजे नाटकात एकंदर पंचवीस संधींची योजना करावी असे ह्या टीकाकारांचे म्हणणे असण्याचा संभव आहे.' पृ. २१९-२०.

प्रा. कंगल्यांचा हा तर्क 'विचारणीय' आहे. प्रस्तुत वाक्याचा अर्थ करताना अभिनवगुप्त 'निर्वहण' या ५ व्या संधीविषयी लिहीत आहेत ही गोष्ट लक्षात ठेवली असता प्रत्येक अवस्थेत हे पाच संधि होतात, म्हणजे नाटकात एकंदर पंचवीस संधींची योजना करावी,' असा टीकाकारांचा अभिप्राय असू शकेल हे तर्काला पटत नाही.

अभिनवभारतीतील प्रस्तुत वाक्य, नव्हे सर्वच परिच्छेद, दुर्बोध, संदिग्ध व भ्रम उत्पन्न करणारा आहे. प्रस्तुत वाक्याचा एक अर्थ असा संभवतो : 'याबाबतीत काही असे म्हणतात की हे सर्व ( पाचही ) संधी ( क्रमाने ) पाच अवस्थामधे ( एकेक अवस्था संपेपर्यंत ) स्वतंत्ररीतीने योजावयाचे असतात.' हे मत दशरूपकारांच्या मताशी जुळणारे आहे, परंतु या वाक्याचा अभिनव गुप्ताना अभिप्रेत असलेला अर्थ नाट्यदर्पणकारानी अचूक हेरला आहे असे त्यांच्या पुढील उताऱ्यावरून दिसून येते :

केचित् तु मुखादयः सन्धयोऽवस्थाश्च यत्र पृथक्पृथक् संक्षेपतः पुनरुल्लिङ्-ग्यन्ते, तं निर्वहणसन्धिमाहुः । यथा सत्यहरिश्चन्द्रे षष्ठेऽङ्के देवः –

आखेटो मुनिकन्यका कुलपतिः कीरः शृगालोऽध्वगाः
विप्रो म्लेच्छपतिर्मनुष्यमरणं लम्बस्तनी मान्त्रिकः ।
उद्बद्धः पुरुषो वियच्चरवधूर्गोमायुनादः फणी
सर्वं सत्त्वपरीक्षणोत्सुकरसैरस्माभिरेतत् कृतम् ॥

आखेट इत्यादिना मुखसन्धिनिबद्धः, कीर इत्यादिना प्रतिमुखसन्धिभाविनः, अध्वगेत्यादिना गर्भसन्धिग्रथिताः, मनुष्येत्यादिना च विमर्शसन्धिसूत्रिता यथासंख्यं प्रारम्भाद्यवस्थानुगताः फलवन्तोऽर्था निवर्हणसन्धावेकवाक्यतापादनार्थं सङ्क्षेपतः पुनरुपात्ता इति । – नाट्यदर्पण, पृ. ५१–५२.

सारांश, जेथे मुखादि पाच संधी व आरंभादि पाच अवस्था यांचा पुनः वेगवेगळा संक्षिप्त निर्देश करण्यात येतो तो निर्वहण संधि होय असे कांहींचे मत आहे : मुखादि संधीत ग्रथित केलेले, आरंभादि अवस्थानी युक्त असलेले बीजादि अर्थ (घटना, फलोपाय) एकवाक्यतेच्या दृष्टीने पुनः संक्षेपाने निर्वहण संधीत वर्णन करावे असे काहींचे मत आहे.

३३. अ) 'वृत्तांताचा क्षय न होणे म्हणजे क्रमशः स्पष्ट होत असल्यामुळे लोखंडी काडयांच्या घोंगडयाप्रमाणे नसणे.' – पृ. २२६.

आ) 'अयः शलाकाकम्बलत्वाभावः' याचा अर्थ स्पष्ट नाही. अयः शलाका म्हणजे लोखंडी सळया, त्यानी बनवलेल्या कांबळयात वीण घट्ट न झाल्यामुळे मध्ये मध्ये तुटकपणा भासतो तसा तुटकपणा संविधानकात असू नये अशा प्रकारचा अर्थ असण्याची शक्यता आहे. मुद्रितात '– कल्पत्वाभावः असे पाठाच्या शेवटी आहे. पण त्यानेही अर्थ स्पष्ट होण्यास मदत होत नाही. – पृ. २२६–२२७,

भाषांतरकारानी स्वीकारलेला पाठ (क्रमेण स्फुटत्वाद्) 'अयः, शलाका कंबलत्वाभावः" एकदम गचाळ आहे आणि त्याचे भाषांतर व त्यावर केलेले टिप्पण खरोखर हास्यास्पद झाले आहे. मुद्रित आवृत्तीतील (क्रमेण स्फुटत्वाद्) अयःशलाकाकल्पत्वाभावः हाच मूळ पाठ असला पाहिजे असे नाट्यदर्पणातील पुढील उताऱ्यावरून सहज दिसून येईल.

अङ्गानि च वृत्तविस्तारकारित्वादवश्यं निबन्धनीयानि । अपरथा राघवस्य पत्नी रावणेन वनांतादपहृता, रामेण च जटायुषः समुपलभ्य, सुग्रीवं सहायं वानराधिराज्यप्रतिपादनादधिगम्य, समुद्रसेतुबन्धमाधाय, निहत्य च रावणं प्रत्यानीतेत्यत्र प्रारंभाद्यवस्थानिबन्धनीयैः पंचभिरपि सन्धिभिर्बीजाद्युपाययुक्ते-

निबद्धे रूपके वृत्तसंक्षेपः स्यात् । तथा च न चमत्कारः । किं च अरंजकमपि वृत्त-मङ्गवैचित्र्येण निबद्धमानं परां रक्तिमावहति, कार्यवशाच्च पुनरुच्यमानमपि वृत्तमंगभंग्या–निबद्धमपुनरुक्तमिवाभाति । अयःशलाकाकल्पता चाङ्गसंबद्धस्य वृत्तस्य न भवति । – पृ. ५३

मुख प्रतिमुखादि पांच संधीची चौसष्ट अंगे भरतानी वर्णन केली आहेत. ही अंगे वृत्त विस्ताराला उपयोगी असल्याने त्यांची नाटयात अवश्य योजना केली पाहिजे. तसे न केल्यास, उदाहरणार्थ, रामकथेवर आधारलेल्या एखाद्या नाटकात वृत्ताचा संक्षेप होईल, वाचक वा प्रेक्षक यांना तसल्या नाटकाने चमत्कार वाटणार नाही. संध्यंगांची योजना केल्याने कथावस्तु क्रमाक्रमाने अभिव्यक्त होते आणि ती लोखंडी सळई अथवा दाभण अथवा सुईप्रमाणे ( अर्थात 'सूचीशतपत्रपत्रशतवेधनयातील ) क्रमहीन अथवा क्रमशून्य ( आणि त्याचा परिणाम म्हणून चमत्कारशून्य ) होत नाही. *

३४. 'परस्परं वंचनप्रवृत्तयोः ............ पृ. २५९
'वंचनप्रवृत्तयोः ही मुळातील 'वचनप्रवृत्तयोः ची दुरुस्ती आहे. प्रस्तुत संदर्भात 'वंचन' च योग्य यात शंका नाही.'

प्रा. कंगल्यांचे हे म्हणणे योग्यच आहे. तथापि मुद्रित पाठात 'परस्पर' जसा जोडून आला आहे तसाच तो दुरुस्त पाठात जोडून घेणे अधिक योग्य होय.

नाटयदर्पणातही अधिकबलाच्या व्याख्येंत 'परस्परवंचनप्रवृत्तयो' ( पृ. ७९ ) असे शब्द जोडूनच आले आहेत.

ह्या एवढया पाठचर्चेवरून अभिनवभारतीचे भाषांतर करणे हा 'महान भार' आहे, याची कल्पना यावी. दशरूप भावप्रकाशन, नाटकलक्षण-रत्नकोश, साहित्यदर्पण यासारख्या उत्तरकालीन ग्रंथात भरतमुनींच्या प्राचीन नाटयशास्त्रातील १८ व १९ या दोन अध्यायात आलेला नाटयरचने संबंधीचा विषय सुस्थित आणि सुरक्षित असा आढळतो त्यामुळे या दोन अध्यायांचे

* 'अयःशलाकाकल्पता च अंगसंबद्धस्य वृत्तस्य न भवति ।' या वाक्याच्या अर्थाबद्दच मतभेदाला अवकाश आहे. हिंदी नाटयदर्पणात ( हिंदी विभाग, दिल्ली विश्व विद्यालय, दिल्ली, पृ. १७८ ) पुढीलप्रमाणे अनुवाद केला आहे : 'और अंगोसे संबद्ध [ अर्थात् अंगोकी शैलीसे निबद्ध ] कथावस्तु लोहेकी शलाकाके समान [ एकदम सीधा अपरिवर्तनीय ] नही रहता है । [ उसमे लचकीला पन आ जाता है जिससे कवि सौंदर्याधानके लिए उसे आवश्यकता-नुसार मोड़माड़ सकता है । ]

भाषांतराचे काम फारसे त्रासदायक नाही हे खरे. परंतु उपलब्ध, मुद्रित अभिनवभारती या टीकेच्या बाबतीत असे विधान करणे कमालीचे अतिशयोक्तीचे ठरावे. अभिनवभारती ही नाट्यशास्त्राची "स्फुटव्याख्या" असल्याचा अभिनवगुप्तांचा दावा मूळ अभिनवभारतीच्या संदर्भात खरा मानावयाला फारसा प्रत्यवाय नाही. फारसा प्रत्यवाय नाही असे म्हणण्याचे कारण की उपलब्ध मुद्रित अभिनवभारतीतील काही परिच्छेद अभिनवगुप्तांच्या लिहिण्याच्या शैलीमुळेही अर्थ जाणून घेण्याच्या दृष्टीने दुर्बोध व खचरट आहेत असा या क्षेत्रात काम करणाऱ्यांचा अनुभव आहे. अभिनव गुप्तांच्या तोलाच्या अनेकशास्त्रपारंगत, महापंडिताने विषमपदभञ्जिका पञ्जिका लिहिली तरच हे परिच्छेद वाचकाना नीट समजू शकतील. हा भाग सोडला तरी या उपलब्ध मुद्रित प्रतीतील कितीतरी भाग आज तरी फार दुर्बोध झाला आहे त्याचे प्रमुख कारण हस्तलिखित तयार करणाऱ्या लिपिकांच्या हातून झालेले प्रमाद ठिकठिकाणचे पाठ भ्रष्ट आहेत, काही ठिकाणी ते त्रुटित, खंडित, गहाळ अथवा अस्ताव्यस्त झाले आहेत. अध्ययन परंपरेतील खंड हे दुसरे प्रमुख कारण. शिवाय अभिनवगुप्तानी उदाहरणे म्हणून उद्धृत केलेली काही नाटके आजपर्यंत तरी उपलब्ध झालेली नाहीत. शिवाय नृत, नृत्य, संगीत शिल्प अभिनव काव्यनाट्य छंदशास्त्र, भाषाशास्त्र इत्यादी विविध विषय नाट्य-शास्त्रात येतात आणि साहजिकच या विविध विषयांचा परामर्श सर्व–तंत्र–स्वतंत्र प्रतिभाशाली अभिनवगुप्तानी या टीकेत घेतला असल्याने सर्व ग्रंथ आणि त्यावरील ही टीका दुसऱ्या भाषेत अनुवादित करणे म्हणजे 'कवेः किल महान् भार:' हे मान्य करायलाच हवे.

प्रा. कंगल्यानी 'रस, भाव, दशरूप आणि संधि निरूपण' या चार अत्यंत महत्त्वाच्या अध्यायापुरते आपले उद्दिष्ट मर्यादित करून रसभाव-विचार व दशरूपक-विधान ही पुस्तके लिहिली. आधुनिक संशोधित आवृत्तीत अपेक्षित असलेली परिशिष्टे या ग्रंथाला जोडली असती तर या ग्रंथाच्या उपयुक्ततेत निश्चितच भर पडली असती. असो. त्यांच्या ग्रंथातील काही उणीवा आणि दोष मान्य करूनही या पुस्तकाद्वारे त्यानी नाट्यशास्त्रविषयक मराठी साहित्यात मोलाची भर घातली आहे यात संशय नाही. या बहुमोल कामगिरी-बद्दल प्रा. कंगले यांना हार्दिक धन्यवाद.



# निवेदन

संतश्रेष्ठ श्री ज्ञानेश्वर यांची सप्त जन्मशताब्दी या वर्षी सर्वत्र साजरी होत आहे. त्यानिमित्ताने 'नवभारता'चा या वर्षीचा दिवाळी अंक --

## ज्ञानेश्वर विशेषांक

म्हणून काढावयाचे योजिले आहे. हा अंक संग्राह्य व संदर्भमूल्य असलेला व्हावा असा प्रयत्न आहे. या अंकासाठी मान्यवर विद्वानांचे सहकार्य लाभणार आहे. अंकाच्या प्रती मर्यादित असल्याने त्याची मागणी वाचकांनी शक्य तितक्या आधी करणे इष्ट ठरेल. वर्गणीदारांना हा अंक नेहमीच्या वर्गणीत मिळेल.

पुढील अंकापासून डॉ. सुरेश म. डोळके यांची 'श्रीचक्रधर विरचित (?) श्रीकृष्णचरित्र' ही लेखमाला सुरू होत आहे. यापूर्वी प्रसिद्ध झालेले 'श्रीकृष्ण चरित्र' अपुरे होते. डॉ. डोळके यांना मिळालेले 'श्रीकृष्ण चरित्र' संपूर्ण असून वैशिष्ट्यपूर्ण आहे.

---








# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

## मराठी

| | | |
|---|---|---|
| (१) | वैदिक संस्कृतीचा विकास ( तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ) | ३०·०० |
| (२) | भावार्थ रामायण ( श्री एकनाथ महाराज कृत ) बालकांड | १२·०० |
| (३) | इतिहासाचे तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) ... | १०·०० |
| (४) | क्रोचेचे सौंदर्यशास्त्र ( अनु. डॉ. रा. भा. पाटणकर ) ... | १०·०० |
| (५) | सिंधु संस्कृती, ऋग्वेद व हिंदु संस्कृती ( प्र. रा. देशमुख ) | १०·०० |
| (६) | पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास ( डॉ. सुमंत मुरंजन ) ... ... ... | ८·०० |
| (७) | चार्वाक–इतिहास आणि तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) | ६·०० |
| (८) | मानवाचा आदर्श ... ... ... ... | ६·०० |
| (९) | नवमानवतावाद ... ... ... ... | ५·०० |
| (१०) | गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) ... ... | ५·०० |
| (११) | लोकशाहीचे धोके ( श्री. पन्नालाल सुराणा ) ... ... | ४·०० |
| (१२) | भारतीय स्त्रीधर्माचा आदर्श ( सौ. कमल पाध्ये ) ... | ४·०० |
| (१३) | हिंदी साहित्यविचार ( प्रा. पॅरेलाल गोहेल ) ... .... | ३·०० |
| (१४) | महाराष्ट्रातील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना ( श्री. चा. अ. दाभोलकर ) .... ... | २·०० |
| (१५) | वायुस्तुति ( माध्व ) समश्लोकी व तात्पर्यार्थासहित ... | १·०० |
| (१६) | न्यायसार – आचार्य भासर्वज्ञप्रणीत मराठी भाषांतर व अर्थबोधक टीपांसहित .... ... | ५·०० |
| (१७) | श्री. यशवंतराव चव्हाण– अभिनंदनग्रंथ ... ... | २०·०० |

मिळण्याचे ठिकाण– प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई ( जि. सातारा )








